

नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

मे - २०१७

- कॉ. शरद पाटील : एक उपेक्षित परिवर्तनवादी विचारवंत
- शेती, शेतकरी आणि शासन -- लेखांक १४
- लो. टिळकांच्या जीवनग्रंथाचे महावाक्य
- मुंगी उडाली आकाशी : मध्ययुगीन मराठी महिला संत
- पहिल्या महायुद्धातील जगू गोडबोले प्रकरण
- पुस्तक परीक्षण : 'दुरून कुठून तरी' आत्मप्रत्ययाची कविता
- जुने लेखन



अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ७०। अंक ८। मे २०१७
वैशाख/ज्येष्ठ शके १९३९
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ४०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

---

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका








# नवभारत

## मे २०१७

## अनुक्रमणिका












# कॉ. शरद पाटील : एक उपेक्षित परिवर्तनवादी विचारवंत

एम. एस. चौगुले

१४ एप्रिल २०१७ रोजी कॉम्रेड शरद पाटील यांचा तिसरा स्मृतीदिन आहे. त्यानिमित्ताने त्यांच्या सहवासातील काही आठवणींना उजाळा देण्याचा हा प्रयत्न. तसा माझा व कॉ. शरद पाटलांचा संबंध येण्याचा योग म्हणजे माझी नोकरी. मी महाराष्ट्र शासनाच्या पाटबंधारे खात्यात नोकरीस होतो. सन १९७३ च्या एप्रिलमध्ये माझी बदली लघुपाट-बंधारे विभाग धुळे येथे झाली. सहकुटुंब मी तिथे गेल्यानंतर मला प्रथम रहाण्यासाठी आसरा अर्थात घराची गरज होती. यासाठी स्थानिक व्यक्तीच्या मदतीची मला आवश्यकता होती. माझो सख्खे मामा कालवश कॉ. एस. पी. पाटील हे कॉ. शरद पाटलांचे मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षातील सहकारी असल्याची माहिती मला होती. मामांनी मला कॉ. शरद पाटलांना देण्याकरीता एक पत्रही दिले होते. तसे मी ते पत्र पोचविले आणि कॉ. शरद पाटलांची ओळखही करून घेतली. पुढे कॉ. शरद पाटलांच्या मदतीने मला धुळ्यात घरही मिळाले. तेव्हापासून मी त्यांच्या सहवासात आलो. दोन-अडीच वर्षांपर्यंत मला त्यांचा सहवास लाभला.

विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात व एकविसाव्या शतकाच्या पूर्वार्धात कॉ. शरद पाटील यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक अभ्यास करून परिवर्तनवादी चळवळी-करिता मार्क्सवादी विचारात भर घालून नविन 'मार्क्स, फुले, आंबेडकर वाद' हा नवा विचार दिला. आजच्या खाऊजा जमान्यात याचे महत्त्व वाटणार नाही. परंतु जातीव्यवस्था व विषमता संपवायची असेल तर या विचारांची अत्यंत आवश्यकता आहे. डॉ. सदानंद मोरे यांनी १८ डिसेंबर २०१६ च्या 'सप्तरंग' या पुरवणीत म्हटल्याप्रमाणे, 'कॉ. शरद पाटील हे फारच उपेक्षित पुरोगामी विचारवंत होते.' असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. कॉ. शदर पाटलांनी चळवळीच्या काळात भारतातील जातीव्यवस्थेचा व प्राचीन सांस्कृतिक इतिहासाचा सखोल अभ्यास केला आणि ते ज्या मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षात होते, त्या पक्षाच्या विचारधारेने जातीव्यवस्था व विषमता नाहिसे करता येणार नाही. असे त्यांचे मत बनले होते. 'जातिव्यवस्था व विषमता नष्ट करण्याकरिता 'मार्क्स-फुले-आंबेडकर' या विचारांच्या समन्वयाची गरज आहे' असे त्यांचे मत होते. कॉ. शरद पाटील धुळे जिल्ह्यातील साक्री, शाहादा, शिरपूर व नंदुरबार तालुक्यात आदिवासी भागात शेतमजूर व लहान शेतक-यांच्या संघटना बांधून, त्यांच्या न्याय हक्कासाठी चळवळ करीत होते. विशेषतः आदिवासी लोकात जागृती निर्माण करीत होते. कॉ. शरद पाटलांनी चळवळीच्या काळात आपले प्राचीन ग्रंथ, त्यातील तत्त्वज्ञान आपणांस कळावे म्हणून संस्कृत, अर्थमागधी व पाली या भाषांचा अभ्यास केला. कारण सर्वधर्मांचे ग्रंथ, तत्त्वज्ञान या भाषेतच उपलब्ध आहेत. कॉ. शरद पाटलांचे इंग्रजी भाषेवरसुद्धा प्रभुत्व होते.

कॉ. शरद पाटलांनी प्राच्य भाषांचा व व्याकरणाचा सखोल अभ्यास केला. नंतर त्यांनी भारतीय तत्त्वज्ञान, पुराणकथा तसेच भारतीय संस्कृतीचा अभ्यास केला. या अभ्यासाच्या आधारे त्यांनी वर्ण, जाती व वर्ग या संकल्पनेची चिकित्सा केली व त्याच्या आधारे त्यांनी अशी मांडणी केली की, "वसाहतपूर्व काळात भारतात वर्णव्यवस्था नव्हती, त्याऐवजी जातीव्यवस्थाक सरंजाम शाहीची समाजरचना होती आणि बुद्धपूर्व काळात दास प्राथक वर्णव्यवस्था होती. (१) कॉ. पाटील पुढे अशी मांडणी करतात की, "भारताचे शोषण शासनाचे वास्तव संघर्षाचे आहे." (२) भारतातील वर्ण जातीव्यवस्थेच्या उगमाचा इतिहासाची त्यांनी आपल्या 'दास शूद्रांची गुलामगिरी' या ग्रंथात मांडणी केली आहे. (खंड १, भाग १ व २) कॉ. शरद पाटील पुराण कथांचा सखोल

अभ्यास करून 'रामायण व महाभारत या पुराण कथांतील प्रमुख पात्रांना भौतिकवादी अर्थ लावतात व कथेतील सत्य शोधतानाच त्यातील वर्णसंघर्षाचा शोध घेतात. कॉ. शरद पाटील यांनी 'अब्राह्मणी साहित्याचे सौंदर्यशास्त्र' हे पुस्तक लिहून नव्या सौंदर्य शास्त्राची ओळख करून दिली आहे. अर्थात त्यांच्या ब्राह्मणी व अब्राह्मणी शब्दांचे अर्थ जातीवाचक नाहीत असे त्यांचे म्हणणे आहे. सन १९७८ मध्ये कॉ. शरद पाटलांचे पोथीनिष्ठ मार्क्सवाद्यांशी पटले नाही म्हणून ते पार्टीतून बाहेर पडले. कॉ. शरद पाटील आपल्या परिवर्तनवादी चळवळीवर व त्यावेळच्या राजकीय परिस्थितीवर समाधानी नव्हते असे मला वाटते. त्यांनी आपल्या घराला नावदेखील 'असंतोष' असेच दिले होते.

पुढे कॉ. शरद पाटलांनी सत्यशोधक कम्युनिस्ट पक्षाची स्थापना केली. या पक्षाचे स्वीकृत तत्त्वज्ञान म्हणजे 'मार्क्स-फुले-आंबेडकर वाद' होय. कॉ. शरद पाटीलसारख्या थोर विचारवंत व परिवर्तनवादी लढावू नेत्याचा मला सहवास लाभला. त्यामुळे त्यांच्या सहवासातील व माझ्या आठवणीतील काही घटनांची नोंद घेतो.

१९७२ च्या दुष्काळी वर्षात महाराष्ट्रात पुरोगामी पक्षांची आघाडी होती. त्यामुळे दोन्ही कम्युनिस्ट पक्ष, लाल निशान पक्ष, शेतकरी कामगार पक्ष व समाजवादी पक्ष या पक्षांच्या राज्यापातळीवरील नेत्यांच्या सभा धुळे शहरात वरचेवर होत असत. मी सुटीदरम्यान कॉ. शरद पाटील यांच्यासोबत कार्यक्रमाला जात असे. त्यामुळे मला या पक्षाचे विचार व राजकीय भूमिका समजत असे. त्याकाळी रोजगार हमी कामाकरीता लढे चालत असत. कॉ. शरद पाटलांच्या सहवासात असतानाच्या दोन घटनांची नोंद घेऊन मी माझा लेख संपवित.

एकदा साक्रीला मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाचे अभ्यास शिबीर होते. (बहुदा १९७४ चा काळ असावा.) मला सुटी असल्याने त्या शिबीराला मी गेलो. परंतु मला त्यात भाग घेता आला नाही. कारण मी त्या पक्षाचा सदस्य अथवा कार्यकर्ता नव्हतो. शिबीरस्थळाच्या बाहेर स्टॉलवर उपलब्ध असलेले पक्षाचे साहित्य वगैरे वाचत बसलो. या शिबीराला मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाचे ज्येष्ठ नेते कॉ. बी. टी. रणदिवे आले होते. शिबीरानंतर संध्याकाळी कॉ. बी. टी. आर.चे जाहीर व्याख्यान होते. व्याख्यान मला ऐकता आले. त्याने मी प्रभावित झालो. कार्यक्रम झाल्यानंतर कॉ. बी. टी. रणदिवे सुरतला जाणार होते. त्याकरिता त्यांना नंदुरबार रेल्वे स्टेशनपर्यंत सोडण्याकरीता कॉ. शरद पाटील नंदुरबारला जाणार होते. मी कॉ. शरद पाटलांना 'मीही तुमच्यासोबत येऊ का?'अशी विचारणा केली. त्यावर त्यांनी होकार दिला आणि मी त्यांच्या ऍम्बेसॅडर कारमधून त्यांच्यासोबत गेलो. कारच्या मागील सीटवर कॉ. पाटील व कॉ. रणदिवे यांच्यात संवाद सुरू झाला. कॉ. शरद पाटील यांनी इंग्रजीमध्ये लिहिलेल्या 'दास, दस्यू ॲण्ड स्लेव्हरी' या पकाशित होणा-या पुस्तकावर चर्चा सुरू होती. नंदुरबार येईपर्यंत ही चर्चा सुरूच होती. कॉ. बी. टी. रणदिवे बहुदा या लिखाणाला सहमत नसावेत असे मला जाणवले. नंदुरबार रेल्वे स्टेशनवरून सूरतला जणा-या रेल्वेनी कॉ. बी. टी. रणदिवे गेले. मी अंमळनेरकडे जाणा-या रेल्वेने पहाटेस धुळ्याला पोचलो.

कॉ. शरद पाटलांच्या सोबतची दुसरी घटना म्हणजे, साधारण १९७४ मध्ये अमेरिकन पत्रकार (बहुधा न्यूयार्क टाईम्सचे असावेत) आले होते. मुंबईहून प्रसिद्ध होणा-या 'रणांगण' या साप्ताहिकाचे संपादक अनिल बर्वे यांच्यासोबत. ते आले होते. कॉ. अनिल बर्वे यांना अमेरिकन पत्रकाराला धुळे जिल्ह्यातील आदिवासी भागातील कॉ. शरद पाटील यांनी उभ्या केलेल्या चळवळीचे काम दाखवायचे होते. त्याचप्रमाणे शहादा तालुक्यातील आदिवासींना संघटित करून त्यांचे हक्क त्यांना मिळवून देण्याकरीता, विशेषतः त्या भागातील जमीनदार आदिवासींना कमी मजूरीवर राबवून घेत होते. त्यासाठी, तसेच वनखात्याचे सरकारी अधिकारी साधा लाकूडफाटा व गवत जंगलातून आणले तरी आदिवासींवर गुन्हे नोंदवून त्रास देत असत, या त्रासातून आदिवासींची सुटका करून त्यांचे हक्क मिळवून देण्याकरीता पुण्याकडील मागोव मंडळाचे चार-पाच तरुण काम करीत होते. त्यात सध्या मार्क्सवादी पक्षात काम करीत असलेले कॉ. कुमार शिराळकर होते. त्याशिवाय अशोक मनोहर हेसुद्धा होते. या मागोवाच्या तरुण मुलांचे आदिवासी मधील चळवळीचे









कामसुद्धा अमेरिकन पत्रकाराला दाखवायचे होते. कॉ. शरद पाटील व मागोवा मंडळाची मुले, कॉ. अनिल बर्वे व अमेरिकन पत्रकार यांच्यासमवेत मी कॉ. शरद पाटलांच्या जीपमधून गेलो होतो. कॉ. शरद पाटलांचे व तरुण मुलांचे काम बघून मी आश्चर्यचकीत झालो. संपूर्ण डोंगराळ भागात कित्येक मैलांचा पायी प्रवास हे कसे करत असावेत? कॉ. शरद पाटील दहा-वीस किलोमीटरचा प्रवास पायी करत होते व पाड्या-पाड्यावरल्या आदिवासींना संघटित करीत होते. त्यादिवशी मी पूर्ण दिवस त्यांच्यासोबत होतो. या परिवर्तनवादी कॉम्रेडचे काम बघून धन्य झालो. या दोन्ही घटना माझ्या कायमस्वरूपी स्मरणात राहिल्या.

पुढे माझी बदली कोल्हापूरला झाल्यावरसुद्धा माझा त्यांच्याशी संपर्क होताच. एकदा गडहिंग्लजला पू. साने गुरूजी वाचनालयातर्फे कॉ. शरद पाटलांचे तीन दिवस व्याख्यान आयोजित केले होते. ते शिवाजी विद्यापीठात ज्या ज्यावेळी कार्यक्रमाला यायचे त्या त्यावेळी मी तिथे आवर्जून उपस्थित रहात असे. वाळव्याला 'दलित आदिवासी ग्रामीण साहित्य संमेलन' होते. त्यात कॉ. शरद पाटलांचा प्रमुख सहभाग होता. त्याशिवाय कालवश डॉ. आनंद यादव संमेलनाचे अध्यक्ष होते. गिरिश कानडि प्रमुख पाहुणे होते. या संमेलनाला मी उपस्थित होतो. कॉ. पाटील यांनी त्या दोघांशी माझी ओळख करून दिली. अशाप्रकारे कॉ. शरद पाटील यांच्यामुळे मला पुष्कळ विचारवंतांचा सहवास लाभला. अशा कॉम्रेडला माझा सलाम.



---



अनुक्रमणिका








## शेती, शेतकरी आणि शासन -

लेखांक - १४

श्री. के. वनपाल

माणसाचे व्यक्तिमत्त्व त्याचे भोवती असलेल्या परिस्थितीनूसार घडते की, त्याचा निसर्गदत्त स्वभावच शेवटपर्यंत टिकून राहतो हा मानसशास्त्रातील गुंतागुंतीचा विषय असावा. थोडक्यात 'स्वभावो दुरतिक्रमः' हा सिद्धान्त खरा की, परिस्थितीनुसार स्वभाव बदलु शकतो हा तो प्रश्न!

तथापि आमच्या महसूल खात्यातील कर्मचा-यांचा स्वभाव मात्र वरिष्ठांच्या कोपीष्ट किंवा शांत वृत्तीनुसार बदलत असतो. सामान्यतः शेतकरी किंवा नागरिक अधिका-याकडे 'कडक' किंवा 'साधा' अशा वर्गीकरणातून पाहतात आणि त्यानूसार त्याच्याशी व्यवहाराचे संधान ठेवतात.

(१)

मी पंढरपुरला प्रोबेशनर म्हणून रूजू झालो तेव्हा सोलापूर जिल्ह्याचे कलेक्टर अतिशय कडक होते अशी बोलवा होती. पण आम्हाला त्यांचा मोठा गमतीशीर अनुभव आला.

एकदा त्यांनी पंढरपुरचा दौरा काढला. संध्याकाळी ते डाक बंगल्यावर येणार म्हणून मी आणि तहसिलदार जाधव डाक बंगल्यावर पोचून त्यांची वाट बघू लागलो. त्यांना थोडा उशीर झाला. सात-साडेसातला ते गाडीतून उतरले. त्यांच्याबरोबर त्यांची पत्नी आणि एक वयस्कर, चांगल्या पोशाखातले गृहस्थ होते. कलेक्टरांनी तहसिलदारांना सांगितले की, हे गृहस्थ कलावंत असून आपल्या पत्नीला गायन शिकवतात. त्यांची व्यवस्था दुस-या 'स्वीट'मध्ये करावी.

हा आमच्यावर बोम्बगोळाच होता. कारण बंगल्यात दोनच स्वीटच होते आणि दुस-या स्वीटमध्ये आरमारातील एक मोठ्या दर्जाचे अधिकारी उतरले होते. त्यांचा दोन दिवसाचा मुक्काम होता. ही अडचण त्यांना सांगणे अगदीच अप्रशस्त झाले असते. त्यामुळे तहसिलदारांनी ही अडचण कलेक्टरांना भीतभीत सांगितली. त्याबरोबर कलेक्टरांचा जो भडका उडाला तो काही विचारू नका. "यू ब्लडी फुल्स, डू नॉट शो युवर डर्टी फेसेस गेट आऊट फ्राम हिअर. आय विल मॅनेज एव्हरीथिंग फ्राम नाऊ ऑन बर्डस्. गेट लॉस्ट."

हा धरणीकंपच होता. एखाद्या घाबरलेल्या कोकरा-प्रमाणे, अवघडल्या अवस्थेत सापडलेले आम्ही, निमूटपणे बाहेर पडलो.

त्या रात्री आम्हाला झोप लागली नाही. मला वाटत राहिले, यात तहसिलदाराची काय चुक? दुस-या दिवशी मी तसे त्यांना बोलून दाखवले ते म्हणाले, "रावसाहेब, कामकाजात चुक झाली तर ती या ना त्याप्रकारे सुधारता येते, मात्र बंदोबस्तामध्ये चुक झाली तर तिचे वाईट परिणाम भोगावे लागतात. तुम्ही प्रोबेशनर आहात, तुम्हाला काही होणार नाही; पण माझं काय होणार? कान्फिडेन्शियल रिपोर्टमध्ये कलेक्टर साहेब माझी काय वाट लावणार याचीच मला काळजी लागून राहिली आहे."

पण तहसिलदार जाधव हुशार होते. त्यानीच दुस-या दिवशी आमदार औदुंबर पाटील यांना गाठलं. काल काय झालं ते सांगितल. एखादा समारंभ पंढरपुरात घडवून आणावा आणि मुख्य पाहुणे म्हणून कलेक्टर साहेबांना बोलवावे असं सुचवलं. झाल्या प्रकाराचा थोडा विसर पडू द्यावा आणि ८-१५ दिवसांनी हा समारंभ साजरा करावा असं ठरवलं तोपर्यंत कलेक्टर साहेबांचा राग जरा निवळेल असा होता.

झालं तसंच. आमदार पाटलांनी पंढरपुरच्या एका मठात ट्रस्टच्या वाढदिवसाचा समारंभ योजला. रीतसर तारीख, वेळ देऊन कलेक्टर साहेबांना बोलावलं आणि सगळा समारंभ उरकल्यावर मागच्या दौ-यात घडलेल्या प्रसंगाबद्दल तहसिलदारांना खूप दुःख झालं वगैरे, जेवण झाल्यावर, सांगितलं.

कलेक्टर साहेब चांगल्या मूडमध्ये होते. ते म्हणाले "आमदार साहेब, छोड दिजीये. 'रात गई बात गई' ऐसा होता रहता है. चाहिए तो तहसिलदार साहेब को बुलाव, मै समझा देता हूं"

आम्ही हे सगळे दुरून पाहत होतो, ऐकत होतो. न जाणो, आणखी काही प्रसंग ओढवतोय का याची भीती होती. कलेक्टर साहेबांच ते वाक्य ऐकलं आणि जाधवराव साहेबांना एकदम 'हुश्श' झालं.

हे कलेक्टर साहेब घरीही असाच रागाचा अवतार धारण करायचे. उशा फेकायचे, फ्लॉवर प्लॉट आपटायचे आणखी काही वस्तू फेकत राहायचे. मग त्यांच्या पत्नी बाहेर येऊन बसायच्या आणि दाराला बाहेरून कडी लावायच्या. कोणी अधिकारी किंवा कर्मचारी घरी सही घ्यायला आला तर 'अब सिग्नेचर नही मिलेगी, साहब घुस्से में है' असं स्पष्ट सांगायच्या.

कलेक्टर साहेबांच्या या वागणूकीतून मी पहिला धडा शिकलो तो हा की, 'बंदोबस्त' हे गहन प्रकरण आहे. ते सांभाळलं पाहिजे.

या उलट, या कलेक्टर साहेबांच्या आधी असलेले कलेक्टर सप्रे हे एकदम शांत गृहस्थ! कसल्याही संकटाचा नाराजीचा, घायकुतीचा प्रसंग असो, ते शांत असत असे सगळे अधिकारी सांगत. त्यांचा निरोप समारंभ ठरला त्या वेळी एका अव्वल कारकुनानं त्या समारंभातच त्यांना विचारलं, "सर, तुम्ही तीन वर्षं इतके शांत कसे होतात? थोंडसे रागीट असतात तरी चाललं असतं, रेव्हेन्यू खात्याला त्याची जरूरी असते." सप्रे साहेब हसले आणि म्हणाले, "मलाही हे पटते. पण काय करू? माझा स्वभावच तसा आहे. असं पहा, अगदी रागावण्यासारखी परिस्थिती उद्‌भवली तरी रागवून काय होतं? आपलच रक्त जळतं. समोरचा माणूस अक्कल पाजळून गेलेला असतो. त्याला काहीच होत नसतं; काही वाटतही नसतं; आपलं मात्र ब्लडप्रेशर वाढत. त्यापेक्षा तो प्रसंग घडलाच नाही असं समजून मार्ग काढला तर आपलाच फायदा होतो. रागावून काय मिळतं?" बघा आता याला काय म्हणायचं.

(२)

महसूल खात्यापुरतं बोलायचं तर तलाठी, सर्कल इन्स्पेक्टर, अव्वल कारकून अस एक वर्तुळ. दुसरं म्हणजे प्रांत ऑफिसर त्याच्या हाताखालचे तीन-चार तहसिलदार आणि शेवटी म्हणजे कलेक्टर आणि त्यांचे मदतनीस प्रांत, तहसिलदार वगैरे अशी ही तीन स्तरीय कुटूंब व्यवस्था आपोआप निर्माण होते. महत्त्वाचे म्हणजे जसा कलेक्टर साहेबांचा स्वभाव आणि वर्तुणूक त्याच पद्धतीचा स्वभाव आणि वर्तणूक इतर सर्वांचीही, असा माहोल तयार होतो जणू सर्वांची श्वासोच्छ्वासाची लय ही एकच असा तो प्रकार! एखाद्या प्रकरणात तलाठी जे उत्तर शेतक-याला किंवा नागरिकांना देईल तेच उत्तर कलेक्टर साहेबांकडून मिळेल हे निश्चित!

या महसूल खात्याच्या अधिका-यांना मुख्यतः शेतक-यांच्या प्रश्नाना तोंड द्यायचं असतं. नेमकं त्याचवेळी शेतकरी कुटुंबेही अशाच प्रकारच्या बहुपेडी कुटुंब व्यवस्थेसह आपल्या वाट्याला आलेल्या अगणित समस्यांशी टक्कर देत असतात. त्यांची घरची माणसं, सालदार, बैलबारदाना इतकेच नव्हे तर बलुतेदार, पाटील, तलाठी, सरपंच या सगळ्यांशी त्यांचे असलेले घाटदार सबंध तो कसे सांभाळतो ते आम्हा अधिका-यांना बघायला मिळते. एखादा मालदार शेतकरी जर सप्रे साहेबांसारखा शांत स्वभावाचा असला तर त्याची काय अवस्था होते हे पाहण्यासारखं आहे.

डॉ. सोळके! मुळात सधन शेतक-याच्या घरी जन्म, त्यामुळे कमतरता कशाचीच नाही. व्यवस्थित शिक्षण घेऊन ते डॉक्टर झाले आता गावी प्रॅक्टीस सुरू करावी की नाही? पण चालून आलेल्या संधीमुळे ते सरकारी नोकरीत शिरले. बीड जिल्ह्यातल्या माझलगाव तालुक्यात त्यांची ६० एकर शेती. शेतीवर खूप प्रेम. निरनिराळे प्रयोग करून पाहण्याची हौस. त्यामुळे दर शनिवारी रविवारी न चुकता शेतीवर हजर!

कुणीतरी सांगितलं सफेद मुसळी, कोरफोड ही नवी प्रचारात आलेली पिकं खूप फायद्याची. सोयाबीन, ज्वारी, बाजरी, कापूस ही काय परंपरांगत पिकं! भाव नसतो, नेहमी नुकसानच होतं. म्हणून नव्या पिकांचा प्रयोग करून पहा.

सुरुवात झाली बुलढाणा जिल्ह्यामधल्या जळगाव-जामूद तालुक्यातल्या एका खेडेगावी. तिथे जवळजवळ

४० एकरावर मित्तल नावाचा एक हुशार मारवाडी सफेद मुसळीचं पीक घेतो असं कळलं. मुळ्यासारखी सफेद असणारी ही वनस्पती व्यवस्थितपणे वाढवली तर याची भुकटी २०००/- रु. किलो या भावानी खपते! कारण ही भूकटी पूर्णपणे प्रोटीनयुक्त असते. याला अरबदेशात खूप मागणी असते.

मग एका शनिवार-रविवारी जळगाव जामूदकडे प्रयाण. सगळी माहिती घेतली. पण शेतीत राबणा-या जवळजवळ दोनशे स्त्रियांची पलटण पाहून इतका मोठा व्याप जमणार नाही, मजूर मिळणार नाही म्हणून तो बेत रद्द! आता कोरफड! नगर, नाशिक या जिल्ह्यात कोरफडीचं बियाणं मिळतं असं कळल्यावरून त्या त्या ठिकाणी जाऊन चौकशी. दहा रुपयाला १ रोप. आता ट्रान्सपोर्टकरून आणयचं कसं, सगळं जमवायच कसं हा प्रश्न तरी पण पुण्यातील आघारकर इन्स्टिट्यूट ही वनस्पती शास्त्रात संशोधन करणारी संस्था आहे, तिथे सगळी माहिती मिळेल म्हणून तिकडेही एक-दोन मित्र घेऊन फेरी. या फिरण्यापायीच पाच-सहा हजार रुपये खर्च. एकूण विचार करता हा प्रयोगही अंगाशी येईल असा निर्णय झाला. त्यामुळे तो ही बेत रद्द.

हे भ्रमण चालू असताना अशी माहिती मिळाली की, आयुर्वेदातील शतावरी आणि अश्वगंधा या औषधी वनस्पतींना खूप मागणी असते. खेरीज त्यांची लागवड व जोपासना सोपी असते. तेव्हा दोन-दोन एकरांना पुरेल इतकं या दोन्हीचं बियाणं विकत घ्यावं असा विचार करून, बियाणं घेऊन गडी गावी हजर. बियाणांची खरेदीच पंचवीस हजार रुपयांची.

लागवड कशी करावी, सरी, वळंबा कसे असावेत याची माहिती आणली होतीच. ती मजूरांना व सालक्यांना समजावून सांगितली आणि पद्धतशीर लागवड केली. पाण्याची पाळी, खूरपणी, सगळं व्यवस्थित होतं की नाही यासाठी शनिवार-रविवारी गावी हेलपाटे सुरू झाले. पीक पहिल्यांदा चांगलं दिसू लागलं. पण नंतर त्यावर रोग पडला की काय, एकदम पिवळं दिसायला लागलं. पण कोणत्या रोगासाठी कुठल्या अवस्थेत काय औषध मारायचं ते कळलं नाही. गाव तालुक्याच्या गावापासून आणि जिल्ह्याच्या गावापासून फार लांब. जवळपास शेतीतज्ज्ञ नाही. आसपासचे सगळे शेतकरी त्यांच्या परंपरागत शेतीत गुंतलेले त्यामुळे वेळच्या वेळी जी उपाययोजना व्हायला पाहिजे ती झाली नाही. खरेदी केलेल्या बियाणांपोटी पंचवीस हजार रुपयांचा चुराडा. बर, ही रोगट रोपटी गाडून टाकावीत की उपटून फेकून द्यावीत हा सतावणारा प्रश्न. डॉ. सोळंकी यांनी सालदाराला वैतागुन सांगितलं की, लाव काय वाट लावायची ती! त्यान खर्च सांगितला २,०००/- रु. एकूण २७,०००/-रुपयाची नुकसानी. खेरीज, भ्रमंतीवर खर्च झालेले रु. ६,०००/-! उन्हातान्हातून हिंडण्याचा त्रास आणि मानसिक त्रास यांचा हिशेब कुठलाच शेतकरी ठेवीत नाही. कारण त्याची किंमत रुपयात होत नाही.

बरं इथं थांबावं तर ते डॉ. सोळंकी कसले!

एकदा गावात फिरत असताना त्यांना एक भोई भेटला. तो तळ्यात मासे पकडत होता. "मासे पकडताय? कुठल्या प्रकारचे मासे?"

"हेच, राहू, कटला, मिरगळ वगैरे"

"काही फायदा होतो का? की फक्त रोजच्या जेवणाची सोय!"

"हां, जेवणाची तयारी, सोय म्हणा फार तर, दुसरं काय?" – भोई

"पण हे नेहमी करून भागत का कुटुंबाच?" – डॉक्टर

"भागतं, पण आणखी एक काम करतो." – भोई

"कोणत?" – डॉक्टर

"आम्हा भोई लोकांना नदीकाठी जाव लागत म्हणून कलिंगडाच्या पिकाची माहिती असते."

"तसली शेती तुम्ही करता का, म्हणजे करू शकता का?"

"का न्हायी साहेब? त्यो तर आमचा हातखंडा तुमची नदीकाठी शेती हाय काय?" – भोई

"नाही. शेती नदीकाठी नाही. पण पाण्याची व्यवस्था आहे."

"मंग तर लै चांगलं. वेळीअवेळी नदीला पूर येऊन पीक वाहून जायची भीती नाही आहे का तसलं काही मनात?"

"आता मनात नाही पण याच गणित कसं काय









असतं?" – डॉक्टर

"साहेब काय बी काळजी करू नका. एकदा ठरवा अन् मला बोलवा. माझा पत्त्या तुम्हाला देतो. कवा बी बोलवा. जमीन बघू, पाणी बघू आणि ठरवू मग तिथचं सगळं" – भोई

मग त्या कोळ्यानं हलक्या हातानं लांब जाऊन पडेल असं जाळं टाकलं आणि डॉक्टरांना आपला पत्ता दिला. तळ्याकाठीच हा मासा आता आपल्याला घावला याचा भोईला मनातून आनंद झाला.

या भोईन हा काय आपल्या डोक्यात कीडा घातलाय? करावी का कलिंगडाची (म्हणजे टरबुजाची) आणि खरबुजाची शेती? दोन-तीन महिन्यात येणारं पीक! जास्त खर्चीक नसावं. बघू? घरी विचार करून जमलच तर करून बघू हा प्रयोग.

घरी आल्यावर डॉक्टरांनी पत्नीला हे सगळं सांगितलं ती म्हणाली, "सांगितलेल सगळं समजलं. इतकं विस्कटून सांगायला नको. ते अश्वगंधा शतावरीचं आणि आधुनिक शेतीचं सगळं बघितलं आहेच की, त्याचेच हे पिल्लू ते दहा-बारा महिन्याचं पीक तर हे तीन-चार महिन्याचं. आता पिल्लू काय त्रास देतंय ते बघायचं!"

डॉक्टर हसले. त्यांना ही प्रतिक्रिया अपेक्षित होतीच पण म्हणाले, "मी अजून काही त्या भोईला बोलावलेले नाही. त्याला तुझ्यासमोर बोलावून घेतो. तू तुझ्या शंका त्याला विचार. पण याचा विचार करायला काय हरकत आहे?"

"हरकत कसली! आणि असली तरी तुमचं तुम्ही तुम्हाला हवं तेच करणार. माझी फक्त साक्ष आणि नुकसानीतली भागीदारी, दुसरं काय?"

"राहू दे, जाऊ दे. बघू वेळ येईल तेव्हा."

(३)

डॉक्टरांच्या डोक्यातून हा विचार काही जाता जाईना. काही दिवस गेले. डॉक्टरांना गप्प बसवेना घेतलं त्यांनी त्या भोईला बोलावून. भोईन सगळं रानं पाहून घेतलं. पाण्याची व्यवस्था बघितली. इंजिन, पाईप लाईन, जमिनीची प्रत हे सगळं व्यवस्थित बघितलं.

"डॉक्टर, हे सगळं छान जमलंय! ठरवा तुमचं काय ते आणि कळवा मला. आता सिझन बी चांगला हाय. आठ-दहा दिवसात लागवड केली तर सिझन बी घावल, काय?" – भोई

भोई गडबड करून जायला निघाला तसं डॉक्टरांनी त्याला बसवून घेतलं.

"आता यातला गणित सांगा. म्हणजे २ एकरात पीक घेतलं तर खर्च किती, उत्पन्न किती, नफा किती ते जरा सांगा ना?" – डॉक्टर

"म्हणजे सिझन घ्यायचाच म्हणताय की? त्याला काय, सांगतो सगळं गणित." भोईनं चंची काढली आणि तंबाखू मळली "म्हणजी बघा हे पीक आम्ही अर्धेलीनं करतो."

"म्हणजे बी-बियाण, खत, मजुरी, पाणी धरणं सगळं अर्धेलीन करता?" – डॉक्टर

"वा ऽ म्हणजी वाटच लागलं की आमची. आमच्याजवळ कुठली औषध? कुठलं बियाणं? कुठली खतं? आमची आपली यातली मजुरी तेवढी खरी." – भोई

"म्हणजे मग तुमच गणित कसं?" – डॉक्टर

"म्हणजी मूळ खर्च असा –

१) खत जागेवर तुम्ही - फसरायचं आम्ही

२) बी-बियाणाच तसचं - लागण आम्ही करणार

३) औषधं तुमची - फवारणी आम्ही करणार

४) फळ तोडणी आम्ही करणार - मार्केटला फळ न्यायची तुम्ही

५) ड्रिप तुम्ही लावायचं - आम्ही पाणी आणि त्यातनं औषध पिकाला देणार

म्हणजी थोडक्यात मजुरीचं काम आम्ही करणार पण बेसिक बी-बियाण, खत, औषध, पाणी तुमचं"

"आता हा सगळा खर्च येणा-या उत्पनातून वजा करायचा. जे उरेल ते उत्पन्न धरायचंय. त्याचे दोन भाग करायचे. एक तुमचा एक आमचा." - भोई

इतर पिकात शेतकरी अर्धेलीन काम करतात तेव्हा निदान खताचा आणि बियाणाचा अर्धा खर्च शेती कसणारा उचलतो हे डॉक्टरांना माहित होतं. त्या अनुषंगानं त्यांनी भोईला विचारलं. "बियाणाचा आणि खताचा खर्च तुम्ही अर्धेलीन उचलणार का? इतर पिकासाठी शेत कसणारा तो उचलतो."




"नाही डॉक्टर, तसं न्हायी. अहो आमचा मासेमारीचा धंदा संभाळून आम्ही हे करतो. इतरांसारख नाही परवडत आणि इतर पिकाची इतकी निगराणी नाही करावी लागत. आम्हाला डोळ्यात तेल घालून करावं लागतं. फळ गळती जर सुरू झाली तर तुमचं भांडवल अन् आमच कष्ट सगळं सगळं फुकट जाणार. म्हणून आमाला बी-बियाणांचा आन् खताचा खर्च न्हायी परवडत आमची कुठं शेती असतेय का शेणखत घालायला? ते शेतक-यांजवळ असतं. अन् बी-बियाणांचा खर्च असा तो का असतोय? १०००-२००० रु.! आमच हातावरचं पोट असतय साहेब."
- भोई

डॉक्टरांनाही मग हे भोईचा व्हवहारज्ञान थोडं पटलं. असही वाटलं की, बी-बियाण आणि खताच्या बदल्यात आपल्याला त्याच एक्सपर्टीस तर मिळेल, इतर शेतक-यांजवळ ते कुठं असतं?

मग डॉक्टरांनी सगळा विचार केला पुण्याचे काही काम काढून देऊन पत्नीला पुण्याला पाठवलं. त्या भोईच्या सहाय्याने २ एकरात टरबूज २ एकरात खरबूज अशी चार एकरात लागवड करून घेतली.

१५ दिवसात रानं कशी फुलून आली हिरवगार शेत, त्यात दिसू लागलेली फुल, डॉक्टरांच मन हरकून गेलं शेतावरच्या ट्रिपा वाढल्या फळ दिसू लागली. मग डॉक्टरांनी मुद्दाम पत्नीला बोलावून घेऊन तिला पिकं दाखवली. पत्नीच्याही चेह-यावर थोडा आनंद दिसल्यान डॉक्टरांना अंमळ बरं वाटलं.

आता फळ तोडून ती बाजाराला पाठवायची वेळ आली. क्रेट्स् पैदा करणं, वाहतूक व्यवस्था करण, विक्री करणं हे जरा जिकीरीचं आणि महत्त्वाच काम असल्यानं डॉक्टरांनी १५ दिवसाची रजा काढली. दररोज बाया बापायाकडून निगुतीन फळ काढून घ्यायची आणि टेंपोन पाठवायची ही काम सुरू झालं. भोयानं इतका विश्वास संपादन केला होता की, डॉक्टरांनी त्यालाच विक्रीसाठी पाठवायचं ठरवलं ज्यानं एवढ्या कष्टानं पिकवलं त्याच्यावर विश्वास टाकला पाहिजे, म्हणजे पुढच्यावेळी तो उपयोगी पडेल असा कयास.

इथच ग्यानबाची मेख सुरू झाली. ३रु. दरानं एक फळ जातंय अस भोयानं डॉक्टरांना सांगितलं. ही फळ तो कुठे नेऊन विकतो हे काही सांगितलं नाही. विचारलच तर काय सांगायच हेही त्यान टेंम्पो ड्रायव्हरला सांगून ठेवलं होतं मात्र माझलगावला फळ विकायची नाहीत. भोयानं आणि टेम्पो ड्रायव्हरनं एका व्यापा-याला पटवलं होतं. तो काही अंतरावर ट्रक घेऊन तयार असायचा. तो ५रु. दराने भोयाला रोख पैसे देत असे. टेम्पोच्या तीन-चार ट्रिपा झाल्या की, ट्रक भरायचा.

शेवटी हिशेबाला डॉक्टर आणि भोई बसले. टेंम्पोचे पैसे रोजच रोज दिले होते. त्यामुळे हिशेबाच्या वेळी तो हजर नव्हता. एकूण खर्च सव्वा दोन लाख रुपये झाला व विक्रीची किंमत दोन लाख रु. दिसत होती. म्हणजे पंचवीस हजार रु. निव्वळ तोटा होता. त्याचे दोन भाग केले म्हणजे डॉक्टरांच्या वाट्याला रु. १२५००/- इतका तोटा खर्चाचा आणि उत्पन्नाचा मेळ बसावा कसा इतकं सुंदर पीकं येऊन हे असं काय झालं? म्हणजे शेतपाल कुठलाही असो, फायद्यापेक्षा खर्च जास्त हे गुणोत्तर काही चुकेना.

ठीक आहे, निदान अनुभव तर चांगला आला असं म्हणून डॉक्टर शांत बसले. अगदी सप्रे कलेक्टरांच्या स्वभावाला अनुसरून हे झालं, असं मला वाटून गेलं.

पुढं नेहमीच्या गड्याला डॉक्टरांनी हे विस्तारून सांगितलं तेव्हा गडी म्हणाला, "तरी मला वाटलच, काही तरी चुकतंच म्हणून. पण आपण कशाला बोला म्हणून मी गप्प बसलो. डॉक्टर, घरी गडी माणसं असताना हे तुम्ही भोयाला का सांगितलं? आम्ही नव्हतो का काय? आम्ही नसतं असं होऊन दिलं. आता पुढच्या सिझनला आपणच हे उत्पन्न घेऊ या जमिनीत पीक चांगल येतंच हे तरी कळलंय आता बघू कसा फायदा होत नाही ते."

डॉक्टरांनी विचार केला झालं ते झालं. इतर उद्योगांनी तोटा होतोच ना? या अनुभवातूनच माणूस शिकत जातो. अनुभव तर वाया जात नाही ना, मग झालं.



# लो. टिळकांच्या जीवनग्रंथाचे महावाक्य

श्री. मा. भावे

आपल्या प्राचीन तात्त्विक ग्रंथात 'महावाक्य' म्हणून काही वाक्ये ओळखली जात. जसे की, 'तत्त्वमसि' हे वेदान्त सूत्रातील महावाक्यं आहे. म्हणजे वेदान्तांचे सार त्याच्यात उतरले आहे. किंवा 'कर्मण्येवाधिकारस्ते' हे भगवद्‌गीतेचे महावाक्य समजले जाते. त्याप्रमाणेच लो. टिळकांच्या जीवनग्रंथाचे सार आपल्याला त्यांच्यां 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळवीनच' त्या वाक्यातून मिळते. त्यामुळेच टिळकांविषयी बोलायचे किंवा लिहायचे झाल्यास या वाक्याखेरीज बोलणे वा लिखाण पुरे होत नाही. टिळकांनी हे वाक्य १९१६ साली उच्चारले. म्हणून गेल्या वर्षी या वाक्यांची शताब्दी टिळकांशी संबंधित अशा 'केसरी', 'टिळक महाराष्ट्र विद्यापीठ' आणि 'महाराष्ट्र काँग्रेस' या संस्थांनी साजरी केली. त्या समारंभांना योगायोगाने हजर राहण्याची संधी मला मिळाली. त्या वेळी तिथे जी भाषणे झाली त्यामुळे काही प्रश्न माझ्यासमोर उभे राहिले म्हणून कोणत्या संदर्भात, कुठे आणि केव्हा टिळकांनी या घोषणेचे प्रवर्तन केले. याचा शोध घेण्याचा मी प्रयत्न केला.

पहिले म्हणजे टिळक खरोखरच असे बोलले होते का? टिळकांचे अगदी निकटवर्ती न. चिं. उर्फ तात्यासाहेब केळकर यांनी लिहिलेल्या टिळक चरित्रात हे वाक्य येत नाही. सदाशिवराव बापट हेही टिळकांच्या परिवारापैकींच होते. त्यांनी 'टिळक सूक्ति संग्रह' नावांचे बहुमोल पुस्तक अतिशय कष्टपूर्वक तयार केले आहे. त्यात हे वाक्य आलेले नाही. न. र. फाटक यांनी लिहिलेल्या 'लोकमान्य' या टिळकांच्या चरित्रात मात्र या ब्रीदवाक्याचा उल्लेख आहे.

पुढचा प्रश्न असा की, नक्की कोणत्या तारखेला टिळकांनी हे वाक्य उच्चारले, 'केसरी' आणि 'महाराष्ट्र काँग्रेस' या दोन्ही संस्थांनी टिळकांच्या भाषणाची तारीख २९ डिसेंबर १९१६ अशी धरली आहे. फाटकांनी मात्र असे म्हटले आहे की, ३० डिसेंबर १९१६ रोजी श्रीमती बेझंट बाईंची होमरूल लीग आणि लोकमान्य टिळकांची होमरूल लीग या दोन संघटनांची संयुक्त परिषद लखनौ येथील काँग्रेसचे अधिवेशन संपल्यानंतर त्याच ठिकाणी भरली होती. या परिषदेत टिळकांनी हे वाक्य उच्चारले. नेमकेपणाविषयी फाटकांचा मोठा कटाक्ष आणि लौकिक होता. त्यामुळे फाटकांची माहिती बरोबर वाटते.

'Swaraj is my birth-right and I shall have it' या वाक्याशी मिळती-जुळती जी वाक्ये, मराठीत किंवा इंग्रजीत, 'टिळक सूक्ति संग्रहात' येतात ती खालीलप्रमाणे आहेत.

१) स्वराज्य हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे. स्वराज्य मागितले नाही, तर मी पशू ठरेन अशी भावना लोकांत पसरली आहे. (स्वराज्याची मोहिम).

२) ज्यांच्या मुठीत स्वराज्य आहे त्यांची मूठ उघडण्याचे सामर्थ्य हीच पात्रतेची कसोटी होय. (केसरी १९१९).

३) आमचा स्वराज्याचा जन्मसिद्ध हक्क मिळेपर्यंत आमचे समाधान होणार नाही. ब्रिटिश राष्ट्रासही बळकटी येणार नाही आणि जगातही शांतता नांदणार नाही. (केसरी १९१९).

४) हिंदी लोक स्वराज्याच्या हक्कास पात्र नाहीत असे म्हणणे म्हणजे लोकांस नाही, तर गेली १०० वर्षे हिंदुस्थानचे राज्य ज्यांनी केले त्यासही पर्यायाने विनाकारण नावे ठेवण्यासारखे आहे. (केसरी १९१५).

५) The Demand for Swarjya is such that it has nothing to do with sedition (Bal Gangaduar Tilak : His writings & Speeches.) (कंसातील उल्लेख मुळात ती वाक्ये जेथे आली आहेत त्या पुस्तकांचे/वृत्तपत्रांचे आहेत.)

यावरून कळून येते की, स्वराज्याच्या जन्मसिद्ध हक्काविषयी जे प्रसिद्ध विधान आहे ते जसेच्या तसे सदाशिवराव बापटांच्या 'टिळक सूक्ति संग्रहात' कुठेच

आलेले नाही.

(१)

तारीख १७ जून १९१४ या दिवशी टिळक मंडालेहून सुटून पुण्याला येऊन पोचले. गुप्तहेर खात्याचे इन्स्पेक्टर सदावर्ते यांनी त्यांना गायकवाड वाड्याच्या दाराशी आणून सोडले, वेळ रात्रीची होती. वाड्याचा दारवान टिळकांना ओळखत नव्हता. त्यामुळे त्याने टिळकांना आडकाठी केली. शेवटी टिळकांचे भाचे धोंडोपंत विद्वंस यांना दाराशी येऊन टिळकांना घरात घ्यावे लागले. यावरून सहा वर्षांच्या कैदेच्या काळात टिळकांशी संबंधित परिसरात केवढे बदल झाले होते. त्याची चुणूक दिसून येते.

तथापि, पुण्यातील लोकांचे टिळकांवरील प्रेम, आदर आणि भक्ती यांच्यात काडीमात्र फरक पडला नव्हता. त्या रात्रीसुद्धा टिळकांच्या घराकडे लोकांची रीघ लागली. सर्व आबालवृद्ध माणसे वाड्याच्या दिवाणखान्यात येत आणि टिळकांच्या पाया पडून तिथेच बसून राहात. त्यानंतरही आठवडाभर टिळकांच्या घरचा माणसांचा राबता वाढतच गेला. सरकारची अशी समजूत होती की, इतक्या मोठ्या बंदिवासानंतर लोक टिळक आणि त्यांचे राजकारण यांना विसरून गेले असतील आणि टिळकांची सुटका ही उपद्रवाला कारण होणार नाही. तथापि, लोकांची ही गर्दी आणि टिळकांवरची निष्ठा समजून आल्याने सरकारचा अपेक्षाभंग झाला. तेव्हा २५ जून १९१४ रोजी सरकारने सरकारशी संबंधित असणा-या लोकांनी (म्हणजे सरकारी नोकर, सरकारी अनुदानातून पगार मिळणारे लोक व निवृत्ती वेतनधारक) टिळकांना भेटू नये असा हुकूम काढला व गायकवाड वाड्याच्या दारावर पहारा बसवला. पहा-यावरचे पोलीस वाड्यात जाणा-यांची नावे लिहून घेऊ लागले. काही शाळकरी मुलांनी सरकारला खिजवण्यासाठी हा उद्योग सुरू केला की, वाड्यात वारंवार जायचे आणि आपली नावे पहारेक-यांच्या यादीत घालायला लावायची.

लवकरच गणपती उत्सव येऊ घातला होता. ह्या उत्सवात टिळकांचा जयजयकार होणार आणि गणपतीच्या मिरवणुकीत टिळकांच्या विजयाच्या घोषणा दिल्या जाणार अशी धास्ती सरकारी अधिका-यांना वाटली. तेव्हा खबरदारी म्हणून पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने गणपती उत्सवावर नियंत्रणे घालणारा हुकूम काढला. त्यात खालील महत्त्वाच्या शर्ती होत्या. –

१) गणपती देवाच्या नावाशिवाय इतर शब्दांचा सार्वजनिक रितीने मोठ्याने उच्चार करू नये.

२) राजद्रोहाबद्दल शिक्षा झालेल्या इसमांची चित्रे किंवा तसबीरी दाखवता कामा नयेत.

३) गणपतीच्या मिरवणुकीत भजनी लोकांना उद्देशून किंवा मेण्यांना उद्देशून, मध्येच उभे राहून, भाषणे करू नयेत.

हे स्पष्ट आहे की, या सर्व अटी टिळकांनासमोर ठेवून ड्रिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटने घातल्या होत्या.

टिळक आणि पुण्यातील स्थानिक इंग्रज अधिकारी यांच्यातील या काहीशा विनोदी आणि काही बाबतीत टिळक भक्तांना चीड आणणा-या झगड्याला अचानक कलाटणी मिळाली, ती युरोपात महायुद्धाला ४ ऑगस्ट १९१४ रोजी सुरुवात झाल्यामुळे. इंग्रज सरकारला वाटू लागले की, या महायुद्धात हिंदुस्थानातून आपल्याला रसद आणि सैनिक यांचा मोठा पुरवठा व्हायला हवा. युद्ध काळात हिंदुस्थानात शांतता नांदली पाहिजे. इतकेच नव्हे, तर टिळकांसारख्या पुढा-यांचा महायुद्धाला आणि सरकारच्या युद्ध प्रयत्नांना पाठिंबा मिळाला पाहिजे.

हे ध्यानात घेऊन मुंबई सरकारने टिळक पक्षाला असे खाजगी रितीने सुचवले की, २५ जून १९१४ चा हुकूम आणि टिळकांच्या घरावरचा पहारा उठवायला आम्ही तयार आहोत. मात्र टिळकांनीही मोठ्या मनाने या संकटाच्या वेळी सरकारविषयी सहानुभूती दाखवणारे उद्‌गार काढावेत.

या सूचनेवरून २७ ऑगस्ट १९१४ या दिवशी टिळकांनी एक जाहीर पत्रक काढले आणि ते 'मराठा' आणि 'केसरी' या आपल्या वृत्तपत्रातून प्रसिद्ध केले. 'मी एकदाच व कायमचे असे सांगून ठेवतो की, आयरलंडातील होमरूल पक्षाप्रमाणे आमचा प्रयत्न ही चालू राज्यपद्धतीत सुधारणा घडवून आणण्याचा असून राज्य बुडविण्याचा नाही.... हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागात अत्याचाराचे जे प्रकार घडून आले आहेत ते माझ्या स्वभावाला प्रतिकूल आहेत.'








'हिंदुस्थानाबद्दल मनात कळकळ असणा-या प्रत्येक इसमास इंग्रजी राज्यापासून होणारे सर्व फायदे अवगत आहेत आणि इंग्रजी बादशाही तक्ताबद्दल आमच्या मनात असलेली राजनिष्ठेची भावना व मनोवृत्ती व्यक्त होण्यास कारण झालेला सध्याचा बिकट प्रसंग पर्यायाने आम्हांस उपकारकच आहे असे माझे मत आहे.'

'जर्मन बादशहाचे विरुद्ध इंग्रजास हाती शस्त्र धरणे भाग पडले आहे हे आपणास माहितच आहे. अशा बिकट प्रसंगी प्रत्येक हिंदी प्रजाजनाने...... इंग्रज सरकारास आपल्याला शक्य असेल तेवढी मदत करून पाठबळ देणे हे त्याचे कर्तव्य आहे, असे माझे पक्के मत आहे. या संबंधी लोकमत व्यक्त करण्याकरता सर्व पक्षांच्या, वर्गांच्या व जातींच्या लोकांची जाहीर सभा पुण्यात भरविण्यात यावी, त्याला आता किंचितही विलंब लावू नये असे माझे मत आहे.'

टिळकांचा हा जाहीरनामा प्रसिद्ध होताच सरकारने आपला २५ जूनचा हुकूम मागे घेतला. अशा रितीने टिळकांच्या मुक्त सार्वजनिक जीवनाला नव्याने सुरुवात झाली.

(२)

टिळकांच्या दृष्टीने इंग्रजांवर आलेले संकट म्हणजे हिंदुस्थानाला मिळालेली संधी. युद्धामुळे इंग्लड मोठ्या संकटात सापडले होते. अशा वेळी खरेतर, जर देशातील लोक बंड करून उठले असते, तर स्वातंत्र्य मिळणे अशक्य नव्हते. पण लोकांची तशी तयारी सध्यातरी दिसत नव्हती. महाराष्ट्रापुरतेच बोलायचे, तर १९०८ साली टिळक तुरुंगात गेल्यापासून महाराष्ट्रात पूर्ण सामसूम झाली होती. टिळकांच्या चळवळीला पाठिंबा देणारी वर्तमानपत्रे सरकारने बंद पाडली होती. १९०९-१० साली जॅक्सन खुनाचा खटला होऊन महाराष्ट्रात पोलिसांनी प्रचंड दडपशाही केली होती. त्यामुळे लोकांचा धीरच सुटल्यासारखा झाला होता. महाराष्ट्राला ही जी अवकळा आली होती तिच्यामुळेच इंग्रज सरकारला टिळकांना सोडून देण्यात कोणताही धोका वाटला नव्हता. खरे पाहता सरकारने टिळकांना ६ महिने आधीच सोडले होते. १८९८ साली टिळकांना राजद्रोहासाठी दीड वर्षांची शिक्षा झाली होती. पण काही माननीय व्यक्तींनी टिळकांना सोडावे अशी विनंती केल्यावर सरकारने एक वर्ष शिक्षा भोगल्यावर टिळकांना सोडले होते. मात्र अशी अट घातली होती की, पुनः राजद्रोहाची शिक्षा झाल्यास सूट मिळालेले हे ६ महिने भरून काढावे लागतील. त्या अटीप्रमाणे, खरे तर टिळकांची सुटका १९१४ च्या अखेरीस झाली असती. पण सरकारने ६ महिने शिक्षेची अट काढून घेतली व टिळकांना बंधमुक्त केले. यावरून दिसून येते की, देशातील जनतेच्या उत्साहशून्यतेविषयी सरकारला किती विश्वास वाटत होता. असो.

युद्ध सुरू झाल्यामुळे देशातील राजकारणाची चौकटच बदलण्याची वेळ आली होती. बंडाचा मार्ग व्यवहाराचा नाही, असे ठरल्यानंतर पर्याय उरला तो जनतेकडून सरकारकडे नवीन राजकीय सुधारणांची एकमुखी मागणी करण्याचा टिळक आता त्या प्रयत्नाला लागले. परंतु ही एकवाक्यता घडवून आणणे सोपे नव्हते. देशातील राजकीय काम करणा-या वर्गात नाना प्रकारच्या फाटाफुटी झालेल्या होत्या.

आजवर म्हणजे टिळक तुरुंगात जाण्यापूर्वी पर्यंत, काँग्रेस ही देशातील एकमेव राजकीय संघटना होती. पण १९०७ सालच्या डिसेंबरात सुरतेला भरलेल्या काँग्रेसमधील जहाल व मवाळ या दोन गटातील मतभेद अध्यक्षांच्या निवडीच्या प्रश्नांवरून उफाळून आले. काँग्रेसच्या त्या अधिवेशनात गदारोळ माजला व काँग्रेस उधळली गेली. काँग्रेस उधळली जाण्यामागे लोकमान्य टिळकांची दांडगाई व आग्रहीपणा हेच कारण होते, असा मवाळ पक्षाचा उघड आरोप होता. टिळक तुरुंगात गेल्यापासून टिळकांचा राष्ट्रीय पक्ष काँग्रेसच्या बाहेरच राहिला होता.

ही झाली काँग्रेसमधील दुफळी पण त्यापूर्वीच इंग्रज सरकारने आणखी एक मेख मारून ठेवली होती. १ ऑक्टोबर १९०६ ह्या दिवशी ढाक्याचे नबाब आणि मुसलमान समाजातील मान्यवर धर्मनेते आगाखान यांच्या नेतृत्वाखाली मुसलमानांचे शिष्टमंडळ त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड मिन्टो यांना भेटले. त्यांनी अशी मागणी केली की, निवडणुकीत मुस्लिम प्रतिनिधी निवडून यावेत यासाठी त्यांना राखीव जागा असतात. म्हणजे हिंदु आणि मुसलमान दोन्ही प्रकारचे मतदार मतदान करतात. मात्र उमेदवार

मुसलमान असावा लागतो. पण ही तरतूद फारशी समाधानकारक नाही. कारण निवडून आलेला मुसलमान प्रतिनिधी हिंदूंच्या अधीन असतो. मुसलमानांचे स्वतःचे म्हणून काही प्रश्न असतात. ते जोरदार प्रकारे मांडण्याचे काम त्याच्या हातून होत नाही. सबब मुसलमानांसाठी जेथे फक्त मुसलमानच मतदान करू शकतील असे स्वतंत्र मतदारसंघ असावेत. ही मागणी केल्यानंतर ढाक्याला १९०६ सालच्या डिसेंबरात मुस्लिम लीगची स्थापना झाली. अशा रितीने मुसलमानांसाठी राजकीय हालचाली करणारी स्वतंत्र संघटना अस्तित्वात आली. पुढे १९०९ साली मीर्ले मिन्टो सुधारणा सरकारने जाहीर केल्या. त्यात मुसलमानांना वेगळे मतदारसंघ देण्याची मागणी मान्य करण्यात आली.

या परिस्थितीत बदलाची सुरुवात अर्थातच काँग्रेस संघटनेतील फाटाफूट संपवून करायला लागणार होती. सुरतेची काँग्रेस उधळली गेल्यानंतर काँग्रेसमधील मवाळांनी अलाहाबादला एक परिषद भरवली. त्यात काँग्रेसच्या सभासदांसाठी एक प्रतिज्ञापत्रक तयार केले. जो काँग्रेसचा सभासद होऊ इच्छितो त्याने त्या प्रतिज्ञापत्रकावर सही केली पाहिजे अशी अट घातली. या प्रतिज्ञापत्रकात असे म्हटले होते की, काँग्रेस ज्या चळवळी करील त्या घटनेला धरून आणि कायद्याच्या तरतुदी पाळूनच करता येतील. राष्ट्रीय पक्षाला ही अट फार जाचक वाटत होती. बंगालच्या फाळणीनंतर जी मोठी चळवळ उभी राहिली तिच्यातच स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण आणि स्वराज्य या चार बाबींवर भर दिला होता. त्यातील बहिष्कार या चळवळीवर मवाळांचा मोठा आक्षेप होता. वरील अटीमुळे बहिष्कारांची चळवळ काँग्रेसमध्ये राहून करणे अशक्य होणार होते. त्यासाठीच राष्ट्रीय पक्ष काँग्रेसच्या बाहेर राहिला होता.

काँग्रेसच्या अधिवेशनाला जे प्रतिनिधी निवडून यायचे त्यांचा मार्गही मवाळांच्या परिषदेने अवघड करून ठेवला होता. परिषदेपूर्वी काँग्रेसच्या अधिवेशनाला जावयाच्या प्रतिनिधींची निवड निरनिराळ्या ठिकाणाच्या संस्था करीत. उदा., पुण्याहून जाण्याचे प्रतिनिधी हे 'सार्वजनिक सभे'मार्फत निवडले जात. ही सभा टिळक पक्षाच्या ताब्यात होती. त्यामुळे टिळक आणि त्यांचे पाठीराखे अधिवेशनास जाऊ शकत. आता अलाहाबादच्या परिषदेने कोणत्या सभांचे प्रतिनिधी काँग्रेसला येऊ शकतील. त्यांची एक यादी केली होती. साहजिकच त्यात मवाळांच्या अखत्यारितील संस्थांची नावे फक्त होती. त्यामुळे जर राष्ट्रीय पक्ष काँग्रेसमध्ये जावयाचा, तर या दोन्ही अटी--प्रतिज्ञापत्रकावर सही करणे आणि नोंदीकृत संस्थानीच प्रतिनिधी निवडणे या शिथिल करणे जरूरीचे होते.

(३)

सुरतेच्या काँग्रेसनंतर एकट्या मवाळांच्या नियंत्रणाखालील काँग्रेसची जी अधिवेशने झाली त्यात येणा-या प्रतिनिधींची घटत चाललेली संख्या आणि काँग्रेसच्या कार्यक्रमाला येत गेलेली उतरती कळा यामुळे मवाळातील कित्येक पुढा-यांना असे वाटू लागले होते की, जहाल पक्षाशी समेट घडवून आणला पाहिजे, १९१४ च्या डिसेंबरात 'मद्रास' येथे काँग्रेसचे अधिवेशन भरले. त्याचे अध्यक्ष भूपेंद्रनाथ बोस हे सभेला अनुकूल होते. या आधीवेशनात बेझंट बाईंनीही 'सध्याची काँग्रस राष्ट्रीय सभा' नसून एका पक्षाची मजलीस झाली आहे असे कडवट भाषण केले. त्यामुळे या अधिवेशनात जहालांशी समेट करण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी एक समिती नेमण्यात आली.

तथापि, जहालांना काँग्रेसमध्ये प्रवेश द्यावयाला मवाळांचे मुंबईतील धुरिणं सर फेरोजशहा मेहता, सर दिनशा वाच्छा आणि त्यांचे पुण्यातील मित्र गोपाळराव गोखले यांचा सक्त विरोध होता. मद्रासचे अधिवेशन भरण्यापूर्वीच गोखल्यांनी (१४/१५ डिसेंबर १९१४) भूपेंद्र बोस यांना पत्र लिहून कळवले होते की, 'टिळकांनी सरकारवर बहिष्कार घालण्याचा आपला उद्देश प्रगट केला असून आयरिश लोकांचे अडवणुकीचे मार्ग ते पुढे आणतील; हे पत्र गोखल्यांनी 'गुप्त' (कॉन्फिडेन्शियल) म्हणून पाठवले होते; पण लोकांच्या आग्रहाखातर ते पत्र उघड करणे बोसांना भाग पडले. त्या नंतर सुब्बराव नावाचे गृहस्थ टिळक व गोखले यांच्या मध्यस्थी करण्यासाठी पुण्याला आले.'

या काळात टिळकांची राजकारणातील आजची (१९१५ सालची) भूमिका, १९०७-०८ साली टिळकांनी घेतलेली बहिष्काराबाबतची भूमिका, सुब्बराव यांचे









टिळकांशी व गोखल्यांशी झालेले संभाषण वगैरे मुद्यांवरून टिळक व गोखले यांच्यात अतिशय कडवट वाद झाला आणि जहाल-मवाळ पक्षातील भांडण वाढत गेले. त्या तपशीलात जाण्याचे कारण नाही. हा वाद १९ फेब्रुवारी १९१५ रोजी गोखल्यांचा मृत्यू झाल्याने अचानक संपला. या वादातील युक्तिवाद, दोन्ही पक्षांनी परस्परांना दिलेली दूषणे वापरलेले जळजळीत शब्द या सगळ्यांची चर्चा मात्र पुढे कित्येक वर्षे चालत राहिली.

काँग्रेसमध्ये जाण्याची टिळक पक्षाची आकांक्षा अशा रितीने फोल ठरली, तरी टिळकांनी स्वराज्याच्या मागणीसाठी जोरदार आंदोलन उभे करण्याचे प्रयत्न सोडले नाहीत. १९१५ सालच्या मे महिन्यात त्यांनी पुण्याला राष्ट्रीय पक्षाची परिषद भरवली. आपली काँग्रेसवरची निष्ठा जाहीर करण्यासाठी असे ठरविण्यात आली की, 'परिषदेत हजर असणा-या प्रतिनिधींना काँग्रेसचे प्रतिज्ञापत्रक मान्य आहे, असे समजण्यात येईल.' या परिषदेचे अध्यक्ष बॅ बॉप्टिस्टा हे होते. त्यांनी आपल्या भाषणांत सांगितले की, "मवाळ-जहाल" हा भेद आपण विसरला पाहिजे. मवाळ म्हटल की, तो गवळ्याच्या दुधाप्रमाणे बेचव व जहाल म्हटला म्हणजे तो.....अत्याचारी ही समजूत आपण टाकून द्यावी." या परिषदेत युद्धातील ब्रिटिश सरकारच्या भूमिकेला पाठिंबा देण्याचा ठराव टिळकांनी मांडला. ते म्हणाले की, "स्वार्थाच्या दृष्टीनेही इंग्रजांचा जय होणे आम्हाला श्रेयस्कर कारण त्यांच्यापासूनच आम्हांला स्वराज्य मिळण्याची आशा." ह्या परिषदेचे मुख्य काम राष्ट्रीय पक्षाविषयी मवाळ पक्ष आणि इंग्रज सरकार यांना वाटणारी धास्ती दूर करणे, हे होते. परिषदेला ९६० प्रतिनिधी आले होते व १००० श्रोते तिकीट काढून आले होते!

काँग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकावर जहालांनी सही करून काँग्रेसचे सभासद होण्याची तयारी अशा रितीने अप्रत्यक्षपणे दाखवली होती. तरी अजून काँग्रेसच्या अधिवेशनाला पाठविण्याचे प्रतिनिधी कोणी निवडायचे हा प्रश्न कायमच होता. त्या बाबतीत नमते धोरण स्वीकारायला फिरोझशहा मेहता व वाच्छा हे मुंबईचे पुढारी तयार नव्हते. त्यामुळे समेटाचे घोडे अडलेलेच होते. अशी कोंडी झाली असताना स्वराज्यासाठी चळवळ करणारी काँग्रेसच्या बाहेरची संघटना उभी करावी. हा विचार टिळक व बॉप्टिस्टा यांनी मांडला. बेझंटबाई या समेटाच्या बाजूनेच होत्या व काँग्रेसमध्येही होत्या. समेट होत नाही असे पाहून त्यांच्याही मनात स्वतंत्र संघटनेमार्फत स्वराज्याची मागणी करावी अशी कल्पना आली आणि सप्टेंबर १९१५ मध्ये 'होमरूल लीग' नावाची संस्था स्थापन केली. आपली लीग ही काँग्रेसला पुरवणीदाखल आहे आणि काँग्रेसच्या प्रतिज्ञा पत्रकाला धरून लोकांना शिक्षण द्यावे हा आमचा हेतू आहे. असे बेझंटबाईंनी आपल्या पत्रकात म्हटले होते. काँग्रेसची निष्क्रियता पाहून काँग्रेसचे माजी अध्यक्ष सुब्रह्मण्यम् अय्यर, विल्यम वडेरबर्न व दादाभाई नौरोजी यांनीही बाईंच्या लीगला पाठिंबा दिला.

१९१५ सालची काँग्रेस मुंबईला भरणार होती. पुढे ज्यांना 'लॉर्ड' ही पदवी मिळाली ते सत्यप्रसन्न सिंह हे या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. ही काँग्रेस भरण्यापूर्वी, १९१५ च्या डिसेंबराला, फेरोझशहा मेहता मृत्यू पावले. त्यामुळे समेटाला विरोध करणा-या नेमस्तांचा बळकट आधारच नाहीसा झाला. समेटवादी नेमस्त आता म्हणू लागले की, "टिळकांनी काँग्रेसला यावे!" त्याला टिळकांनी चपखल उत्तर दिले की, 'समोरचा मोठा दरवाजा लावून घेता आणि माडीवर चढून घरात या असे म्हणता, हे तुमचे कोण ऐकेले?'

पण जहालांचा काँग्रेस-प्रवेश थांबवता येणे आता अशक्य झाले होते. मुंबईच्या काँग्रेसला जहाल पक्ष हजर नव्हता. मुख्य प्रश्न, प्रतिनिधींची निवड करण्याचा अधिकार कोणत्या संस्थांना असावा, हा होता. या अधिवेशनात या संबंधात काँग्रेसच्या घटनेत दोन दुरुस्त्या करण्यात आल्या. (अ) जे प्रतिनिधी निवडायचे ते कोणत्याही नोंदवलेल्या सभेचे सभासद असलेच पाहिजेत असे नाही आणि (आ) १९१५ च्या पूर्वी दोन वर्षी अस्तित्वात आलेल्या (व काँग्रेसची मान्यता मिळालेल्या) संस्थाना जास्तीत जास्त १५ प्रतिनिधी निवडून देता येतील. थोडक्यात, १९०८ साली ज्या संस्था काँग्रेसच्या यादीत होत्या, त्यांच्याहून निराळ्या संस्थांनाही हा अधिकार आता मिळावा. जहालांच्या काँग्रेस-प्रवेशातील अडथळा ब-याच प्रमाणात दूर झाला.

(४)

मुंबईत भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनात जहाल पक्ष सामील झाला नव्हता. पण टिळकांनी आपले धोरण खंबीरपणे पुढे रेटण्याचे ठरवले होते. त्याप्रमाणे पुण्याला एक बैठक भरून मुंबई, महाराष्ट्र आणि व-हाड या तीन भागांपुरती होमरूल लीग काढावी असे ठरविण्यात आले. पुढे बेळगावला राष्ट्रीय पक्षाने प्रांतिक परिषद भरवली तेव्हा लीग रितसर स्थापन करण्याचे ठरवले. लीगचे अध्यक्ष बॉप्टिस्टा, चिटणीस केळकर अशी योजना होऊन सभासदांची नोंदणी करण्याचे काम सुरू झाले. टिळकांनी होमरूल लीगचा जोरदार पाठपुरावा सुरू केला. त्यांनी विदर्भात आणि महाराष्ट्रात मोठमोठे दौरे काढले आणि होमरूल लीगसाठी पैसे जमवण्याची पराकाष्ठा केली. होमरूल लीगमुळे फार मोठे चैतन्य महाराष्ट्रात निर्माण झाले. अर्थात लीग ही स्वतंत्र संघटना होती आणि तिचा काँग्रेसशी काही संबंध नाही हे पहिल्यापासूनच स्पष्ट करण्यात आले होते.

आपण पाहिलेच की, काँग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकावर सही केल्यास जहालांनाही काँग्रेसमध्ये प्रवेश मिळणार होता. परंतु आता अडचण टिळकांच्या राष्ट्रीय पक्षातूनच निर्माण झाली होती. कारण असे की, राष्ट्रीय पक्षातील कट्टर लोकांचे असे मत होते की, ज्या कारणांवरून आपण गेली सहा-सात वर्षे काँग्रेसपासून दूर राहिलो, ज्या प्रतिज्ञापत्रकाला आपण कडाडून विरोध केला, ज्या नेमस्ताना आपण सरकारचे जी धार्जिणे म्हणून आजवर तिरस्काराने वागवले त्यांच्याच अटींना मान्यता देऊन आपण काँग्रेसमध्ये जाणे ही एक शरणागतीच होय. त्यामुळे ती कधीही मान्य करता कामा नये.

तेव्हा टिळकांनी असे ठरविले की, आपल्या पक्षातील या कट्टरांना एकदा उघडपणे तोंड दिले पाहिजे. यासाठी त्यांनी १६ सालच्या एप्रिल महिन्यात बेळगाव येथे प्रांतिक परिषद भरवली. तिचे अध्यक्षस्थान दादासाहेब खापर्डे यांना देण्यात आले होते. या प्रांतिक परिषदेला महात्मा गांधीही हजर होते. आपण काँग्रेसमध्ये गेलो असता काँग्रेसचे स्वरूप कसे बदलेल, होमरूल चळवळीला कसा उठाव मिळेल, सरकारपुढे एकमुखाने नवीन सुधारणांची मागणी ठेवल्यामुळे सरकारवर ती मान्य करण्यासाठी कसा दबाव येईल याचे आकर्षक चित्र टिळकांनी रंगवले. तथापि टिळक पक्षातील निष्ठावंत आणि कट्टर लोकांना ते पसंत पडले नाही. वाद विकोपाला गेला. समेट करता करता आपल्या पक्षातच फूट पडणार की, काय असे वाटू लागले.

इतक्या टोकाचा विरोध होईल ही कल्पना पूर्वी पुण्यात टिळकांच्याच वाड्यात अनपौचारिक सभा झाली होती, तेव्हाच आली होती. त्या दिवशी सकाळपासून काथ्याकूट चालला होता. टिळक बोलण्यातून मधूनच उठून माडीवरील आपल्या खोलीत जाऊन बसत. अखेर गंगाधरराव देशपांडे यांनी टिळकांच्या खोलीत जाऊन त्यांना विचारले, "तुमच्या मनात काय आहे ते स्पष्ट सांगा. असल्या प्रसंगी वैयक्तिक मते बाजूला ठेवून आपल्याच बुद्धीला शरण जाणे योग्य आहे." तेव्हा टिळक म्हणाले, "एकदा खल होऊन जाऊ द्या. माझ्या मनात क्रीडवर (प्रतिज्ञापत्रकावर) सही करून काँग्रेसमध्ये जावे असे आहे."

पुढे बेळगावमध्ये तर डॉ. मुंजे यांनी समेटाला तीव्र विरोध केला. "क्रीडवर सही करून काँग्रेसमध्ये जाणे मला अजिबात पटत नाही. परशुरामाचा व श्रीकृष्णाचा पराभव त्यांचा अवतार संपल्यामुळे जसा झाला तसा काँग्रेसमध्ये गेल्याने तुमचा होणार आहे........अर्थात श्रद्धेच्या परीक्षेची ही वेळ असल्यामुळे मी तुमच्या विरूद्ध जाणार नाही. तेव्हा टिळक म्हणाले, 'या वेळेस हेच करणे शहाणपणाचे आहे हे तुमच्या प्रत्ययाला येईल.' पुढे टाईम्सने असे लिहिले की, 'समेटाच्या ठरावाने टिळकांनी काँग्रेस काबीज केली', तेव्हा माझे डोळे उघडले,' हे मुंज्यांनी टिळकांविषयीच्या आठवणीत लिहिले आहे.

पुढे बेळगावला कट्टरांनी रात्री सभा भरवून समेटाचा ठराव येईल त्याला विरोध करायचा असे ठरवले. पण टिळकांना समक्ष विरोध कुणी करायचा हे ठरेना. दुस-या दिवशी ठराव चर्चेला आला तेव्हा टिळकांनी प्रत्येकाला हडसून खडसून सांगितले की, 'विरोध करायचा असेल, तर आता पुढे या.' पण तसे करण्याची कोणासही छाती झाली नाही. ठराव एकमताने संमत झाला.

होमरूलची चळवळ सुरू झाल्यावर सरकारही










जागे झाले आणि त्यांनी दडपशाही करण्यास सुरुवात केली. नवीन 'प्रेस ॲक्ट' करून होमरूलला पाठिंबा देणारी वर्तमानपत्रे पाडण्याचा प्रयत्न झाला. जामीन घेण्यास सुरुवात झाली. याच वेळी टिळकांवरही राजद्रोहाचा तिसरा खटला सरकारने भरला. परंतु हायकोर्टाने टिळकांची सुटका केली. सरकारचा टिळकांना तुरुंगात बंद करण्याचा प्रयत्न फसला.

(५)

या पृष्ठभूमीवर काँग्रेसचे अधिवेशन लखनौ येथे भरले. अंबिकाचरण मुजुमदार हे या काँग्रेसचे अध्यक्ष होते. अधिवेशन मोठ्या झोकात पार पडले; कारण प्रथमच जहाल आणि मवाळ हे दोन्ही पक्ष एकत्र आले होते. ह्याच दिवसात मुस्लिम लीगनेही आपले अधिवेशन लखनौलाच भरवले होते. त्याचा उद्देश हा होता की, काँग्रेस व मुस्लिम लीग यांच्यातील मतभेद बाजूला ठेवून राजकीय सुधारणांच्या मागणीसाठी दोन्ही पक्षांनी एकत्र यावे.

लॉर्ड हार्डिंज हा हिंदुस्थानचा व्हाईसरॉय म्हणून १९१०-१६ या काळात काम करीत होता. तो हिंदी लोकांच्या राजकीय आकांक्षांविषयी सहानुभूती बाळगत असे. महायुद्ध सुरू झाल्यावर आपल्या विधीमंडळातील गोखले, जीना वगैरे हिंदी सभासदांना त्याने सुचवले की, तुम्हास कोणत्या स्वरूपाच्या राजकीय सुधारणा हव्यात त्यांचे प्रारूप करून द्या. त्याप्रमाणे केंद्रीय विधिमंडळातील १९ सदस्यांनी सुधारणांचा आराखडा तयार केला. ऑक्टोबर १९१६ मध्ये त्यांनी तो नवा व्हाईसरॉय लॉर्ड चेम्सफर्ड याच्याकडे सुपूर्द केला. ताबडतोब मुस्लिम लीगनेही आपल्या मागण्यांची यादी सरकारला दिली. त्यात दोन महत्त्वाच्या मागण्या होत्या. (अ) प्रांतांच्या आणि केंद्रीय विधिमंडळातील मुस्लिम प्रातीनिधींची संख्या ठरवावी; (आ) मुस्लिम धर्म व रिवाज यांच्यात ढवळाढवळ करणारे कायदे करताना मुसलमानांच्या भावनांची बूज राखली जावी.

लखनौला काँग्रेस व लीग यांच्यात या मागण्यांविषयी करार करण्यात आला. त्याला 'लखनौ-करार' असे म्हणतात.[१] त्याविषयांच्या वाटाघाटीत टिळक काँग्रेसतर्फे एक प्रतिनिधी होते. या करारावर त्या वेळी व नंतरही अनेकांनी टिका केली व मुसलमानांना झुकते माप दिल्याचा आरोप टिळकांवर केला. त्याबद्दल अनेक मुद्दे मांडता येण्यासारखे आहेत. टिळकांचा उद्देश असा होता की, इंग्रजांकडे ज्या मागण्या करावयाच्या त्या एकमुखाने केल्या पाहिजेत. त्यात मतांतरे नकोत. लखनौ कराराने तो उद्देश सिद्धिस गेला. लो. टिळकांच्या राजकीय कारकिर्दीतील हा परमोच्च बिंदू होता.

हिंदी राजकारणातील जहाल, मवाळ, मुसलमान अशा सर्व राजकीय प्रवाहांना एकत्र आणून त्यांची एकमुखी मान्यता असलेल्या सुधारणांचा मसुदा तयार करण्याची जी अभूतपूर्व कामगिरी लो. टिळकांनी करून दाखविली; त्यासाठी वाटाघाटी करताना जी उत्कृष्ट मुत्सद्देगिरी त्यांनी प्रकट केली; या मागण्यांचा आग्रह लावून धरण्यासाठी आपले हक्काचे साधन म्हणून होमरूल लीग त्यांनी स्थापन केली व अल्पावधीत तिला प्रबळ बनवले, यामुळे हिंदी राजकारणावर टिळकांची झळझळीत मुद्रा उमटली आणि राजकारणातील एक सीमावृक्ष म्हणून सार्वत्रिक आदराला ते पात्र ठरले.

लखनौ येथील काँग्रेसचे अधिवेशन २९ डिसेंबर रोजी संपले. ३० डिसेंबरचा लखनौ येथील 'ब्रह्मविद्या-मंडपा'त दोन्ही 'होमरूल लीग्ज'ची एकत्र परिषद भरली. या परिषदेत टिळकांनी 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळवणारच' हे ऐतिहासिक वाक्य उच्चारले. त्यातील 'जन्मसिद्ध हक्क' हा शब्दप्रयोग स्वातंत्र्यपूर्वकालीन राजकारणाच्या संदर्भात फार महत्त्वाचा आहे.

इंग्रजांनी सारा हिंदुस्थान आपल्या कब्जात आणला; १८५७ सालचा उठाव दडपून टाकला आणि त्यानंतर (१९१७ पर्यंत) जवळ जवळ साठ वर्षे निष्कंटक राज्य भोगले. हे सारे त्यांच्या लष्करी बळामुळे झाले. तथापि, या उघड्या-नागड्या सत्याला झाकून ठेवण्यासाठी इंग्रजांनी प्रथमपासूनच असा प्रचार करण्यास सुरुवात केली की, हिंदुस्थानातील समाज हा अंधश्रद्धा, अज्ञान आणि रानटी धर्म यांच्या कचाट्यात सापडून मनुष्य-जातीच्या मुख्य भागापासून दुरावला आहे. मनुष्यजातीच्या इतिहासाचा मुख्य प्रवाह शास्त्रीय ज्ञान, औद्योगिक प्रगती व आर्थिक विकास यांच्या दिशेने चालला आहे. आम्ही इथे राज्य

करण्यासाठी आलो ते या मुख्य प्रवाहापासून डबक्याप्रमाणे बाजूला पडलेल्या या हिंदी समाजाला सुधारून या प्रवाहात आणून सोडण्यासाठी. त्यासाठी आम्ही येथे नवीन प्रकारचे शिक्षण देण्यास सुरुवात केली; वेळोवेळी राजकीय सुधारणांचे हप्ते दिले; तुम्हाला नवीन पद्धतीची न्यायव्यवस्था स्थापन करून दिली; वृत्तपत्रे, पुस्तके, सभासंम्मेलने यांच्या सहाय्याने आधुनिक सार्वजनिक जीवनाची घडी बसवली. तुम्ही सुधारकाला, आमच्या शिस्तीने राज्य चालवण्याइतके प्रौढ झालात की, सर्व कारभार तुमच्याच हाती येईल.

राज्यकर्त्यांच्या अशा थापेबाजीवर कुणाचं समंजस माणसाचा विश्वास बसला नसता. आश्चर्याची गोष्ट म्हणजे देशातील सुरुवातीच्या नवशिक्षितांचा सरकारवर गाढ विश्वास होता. लोकहितवादी यांनी आपल्या 'शतपत्रा'तील एका पत्रात हिंदुस्थानाला स्वातंत्र्य कसे मिळेल याचे एक वेळापत्रकच मांडून दाखवले होते. न्या. रानडे यांना देखील इंग्रजांचे इथे राज्य येणे हे एक दैवी वरदानच वाटत होते. नामदार गोखले हे शेवटपर्यंत असे मानत असत की, इंग्रज राज्यकर्त्यांकडून आपणास खूप शिकण्यासारखे आहे. ज्याप्रमाणे इंग्लंडमधील बहुजनांनी चळवळी करून तेथील अभिजन वर्गाकडून वेगवेगळ्या सवलती मिळवल्या त्याप्रमाणेच कायदेशीर चळवळी करून सरकारकडून नव्या राज्यसुधारणा मिळवत आपण एक दिवस सर्व सरकारी कारभार हस्तगत करू शकू.

लो. टिळकांचा मात्र सरकारच्या या भूलभुलैयावर अजिबात विश्वास नव्हता. त्याचे मित्र खापर्डे यांनी टिळकांच्या आठवणींच्या दुस-या खंडात जी प्रस्तावना लिहिली तीत म्हटले आहे की, 'सुधारणांना शेवट नाही ही गोष्ट टिळकांनी लवकरच ओळखली.' बरे, हिंदी जनता पुरेशी सुधारली आहे की, नाही हे ठरवायचे कोणी? तर इंग्रजांनी! ते तुम्हाला थोडेच सुधारल्याचे सर्टिफिकेट देणार होते! म्हणून टिळकांनी स्वातंत्र्यासाठी इंग्रजांनी पुढे केलेली सुधारणांची अटच नाकारली. आम्ही स्वतःहून सुधारू किंवा न सुधारू, इंग्रजांनी घालून दिलेल्या कित्त्यानुसारच सुधारू किंवा दुस-या कोणत्या दिशेने सुधारू, आम्ही सुधारलो की, नाही ह्यावर स्वातंत्र्य अवलंबून असताच कामा नये. आम्ही मनुष्य म्हणून जन्माला आलो आणि त्यामुळे आमचा स्वातंत्र्य मिळवण्याचा अधिकार आणि स्वतंत्र असण्याचा अधिकार जन्मसिद्धच आहे. अधिकाराला जन्मसिद्ध हे विशेषण टिळकांनी जाणीवपूर्वक लावले होते. हे यावरून कळून येईल.

काही विद्वानांनी असे म्हटले होते की, 'I shall have it' या वाक्यांशातील 'It' हे सर्वनाम 'हक्क' या नामाचा निर्देश करीत नसून 'स्वातंत्र्य' या नामासाठी वापरले आहे. त्यामुळे मूळ इंग्रजी वाक्याचे मराठी भाषांतर 'स्वराज्य हा जन्मसिद्ध हक्क आहे आणि ते मी मिळवीनच' असे केले पाहिजे परंतु ही शक्कल पुरेशी खात्रीलायक नाही. इंग्रज हे हिंदी लोकांचा स्वराज्यावरचा हक्कच नाकारत होते. स्वराज्याचा हक्क केवळ त्यांनाच आहे की, जे पाश्चात्त्यांच्या मोजमापाने सुधारणेच्या कसोटीस उतरतात, असा त्यांचा दावा होता. हिंदी लोक सुधारलेले आहेत की, नाहीत हे ठरवण्याचा राज्यकर्त्यांचा अधिकार आणि त्यांच्या प्रमाणपत्रावर हिंदी लोकांचा स्वराज्य मागण्याचा हक्क अवलंबून ठेवण्याची इंग्रजांची लबाडीची चाल, ह्या दोन्ही गोष्टी ठामपणे नाकरण्यासाठी टिळकांनी स्वराज्याचा हक्क हा निरपवाद आणि विनाशर्त आहे. असे जाहीरपणे सांगितले. स्वराज्यापेक्षा स्वराज्य मागण्याच्या हक्कावर टिळकांचा अधिक भर होता. त्यामुळे प्रचलित असलेले मराठी भाषांतर योग्य आहे असे वाटते.

असो, गेल्या वर्षी टिळकांच्या आयुष्यभराच्या धडपडीचे सार सांगणा-या सर्व प्रसिद्ध वाक्याच्या प्रगटीकरणाची शताब्दी होती. त्यानिमित्ताने हे वाक्य टिळकांनी कोणत्या दिवशी, कोठे आणि कोणत्या पृष्ठभूमीवर उच्चारले त्याचा शोध घेण्याचा हा प्रयत्न होता. सुधारणांची एकमुखाने व निरपवाद मागणी सरकारपुढे ठेवण्यासाठी टिळकांनी अतिशय प्रगल्भ मुत्सद्देगिरी व्यक्त केली. त्यामुळे टिळकांचे नेतृत्व सा-या हिंदुस्थानाला मान्य झाले व पुढेही नेतृत्वाचा एक मानदंड म्हणून टिळकांचा स्वीकार करण्यात आला.

**टीप** :-

१) मुस्लिम लीगच्या या दोन मागण्यांविषयी 'लखनौ



अनुक्रमणिका

करारा'त खालील गोष्टी मान्य करण्यात आल्या.

अ) मुस्लिम समाजाविषयी कायदा करताना केंद्रीय विधिमंडळातील मुस्लिम सदस्यांपैकी तीन चतुर्थांश सदस्यांची मान्यता घेतली पाहिजे.

आ) केंद्रीय विधिमंडळातील एकूण जागांपैकी एक-तृतीयांश जागा मुसलमानांसाठी राखीव असतील.

इ) निरनिराळ्या प्रांतातील विधिमंडळात मुस्लिम प्रतिनीधींच्या जागा किती असाव्यात, हे नव्याने ठरविण्यात आले. उदा., पंजाबात मुसलमान बहुसंख्येने असतानाही १९०९ च्या कायद्यात त्यांच्यासाठी राखीव जागा ठेवल्या नव्हत्या. त्या आता ठेवण्यात आल्या.

इथे हे ध्यानात घेणे गरजेचे आहे की, त्याकाळी मतदानाचा अधिकार सार्वत्रिक नव्हता. उत्पन्न, शिक्षण सरकारला देत असलेल्या कराचे प्रमाण इत्यादी अनेक अटींची पूर्तता करणा-या प्रौढ पुरुषास मतदानाचा अधिकार होता. या अटींची पूर्तता करण्याची क्षमता फारच थोड्या मुसलमानांकडे असे, बंगालमध्ये मुसलमान बहुसंख्य होते. पण मतदारांच्या यादीत त्यांचे प्रमाण खूपच कमी होते. बंगालात मुसलमानांची संख्या जास्त असल्याने, लखनौ-करारातील इतर अटींमुळे, बंगालात मुसलमानांना स्वतंत्र जागा व राखीव मतदार-संघ असायला नको होते. पण मतदारांच्या यादीत ते अल्पसंख्य असल्याने त्यांना स्वतंत्र जागा व राखीव मतदार-संघ मिळाले.

(भारत इतिहास संशोधक मंडळातील 'राजवाडे व्याख्यानमाले'त दिलेले व्याख्यान.)



---



अनुक्रमणिका

# मुंगी उडाली आकाशी : मध्ययुगीन मराठी महिला संत

प्रभाकर गद्रे

मध्ययुगीन महाराष्ट्राचे अविभाज्य लक्षण म्हणजे भक्ती चळवळ होय. सहाव्या-सातव्या शतकांत दक्षिण भारतात भक्ती चळवळीचा उगम होऊन त्याचा पुढे भारतभर प्रसार झाला. सतराव्या-अठराव्या शतकापर्यंत महाराष्ट्रावर या चळवळीचा प्रभाव होता. भक्ती चळवळीने कर्मकांडास आणि ब्राह्मणी वर्चस्वास विरोध करून संस्कृत ऐवजी मराठीचा व दख्खनी हिंदीचा वापर केला. यात नामदेव, तुकाराम, चोखा महार वगैरे शुद्र, अतिशुद्र आणि अशिक्षित लोकांचा समावेश होता. या चळवळीत महिलांचा ही अभूतपूर्व उदय झाला.

मध्ययुगीन महाराष्ट्राच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीवर महिला संतांच्या उदयाचा शोध घेण्याचा येथे प्रयत्न केलेला आहे. या शोधात महिलांची तात्त्विक आणि व्यवहारी भूमिका आणि त्यांच्या दृष्टिकोणाचा विचार केला आहे. पुरुष संतांच्या साहित्यात महिलांना "नरकाचे दार" म्हटले आहे. बहिणाबाईसारख्या कवियत्रीनेसुद्धा स्त्रीला पुरुषप्रधान संस्कृतीच्या दृष्टीनेच पाहिले आहे. तर बाकीच्या महिलांनी या दृष्टिकोनास विरोध केला आहे. या शिवाय परंपरागत चौकटीत त्या कितपत काम करू शकल्या ती चौकट मोडण्यात त्यांना कितपत यश आले, त्यांच्या जीवनाचा व विचाराचा समाजावर कितपत प्रभाव पडला, मराठी समाजातील स्त्रियांची आर्थिक व सामाजिक स्थिती याचाही येथे विचार अभिप्रेत आहे. या शोधपत्राच्या पहिल्या भागात महाराष्ट्रीय समाजिक स्थितीचा विचार केला असून दूस-या भागात महिला संतांचा उदय आणि भूमिका यांचा विचार केला आहे.

**मध्ययुगीन समाज स्थिती** :

मराठी समाज पुरुषप्रधान असल्यामुळे महिलांना नेहमी दुय्यम मानले जाते. मध्ययुगात यावर अधिकच भर देण्यात आला. मुलाच्या जन्माचे स्वागत व मुलीच्या जन्माला नाक मुरडणे व तिला परक्याचे धन समजणे ही मराठी परंपरा आहे.

यात सर्वात करुण स्थिती कान्होपात्राची आहे. ती म्हणते, "दीन पतित अन्यायी शरण आल्ये विठाबाई" मी तो आहे. यातीहिन न कळे काही आचरण[१] पतित जीवाचा उद्धार करण्यास विठ्ठलाचा आसरा हा एकच उपाय असल्याचा तिचा हा विश्वास आहे. आपल्या उद्धाराच्या निदिध्यासातून तिने विठ्ठल चरणी आत्मसमर्पण केले आहे. "उभा असे विटेवरी। वाटी प्रेमाची शिदोरी।।" किंवा "ऐसी नाम माळा। कान्होपात्रा ल्याली गळा।।" या समर्पक शब्दात तिने आपले अंतःकरणाचे खरे स्वरूप प्रगट केले आहे. कान्होपात्राचे स्वरूप तरी प्रगट होते पण गोणाईचे काव्य प्रगट होत नाही. तिचे नाव व तिची माहिती आपणात नामदेवाचा आत्मचरित्रापर अभंगात आणि तुकारामाच्या "तीन कोटी अभंग गोणाईचा वाद। स्वात्मसुखबोध। सुखाचा तो" या अभंगात मिळते सुदैवाने जनाबाईबद्दल आपणास बरीच माहिती मिळते ती "नामयाची दासी जनी" अभिमानाने म्हणून घेत असे यावरून तिची दास्यवृत्ती दिसून येते म्हणून ती "संताचे चरणी लोळे नाचे दासी जनी" असे सहज म्हणू शकते. जनीच्या अंभगाचे लेखन प्रत्यक्ष परमेश्वरच करीत असे या उक्तीतील अतिशयोक्ती सोडली तरी तत्कालीन संत मंडळात तिची योग्यता काय होती ते दिसून येते. जनाबाईच्या थालीपाक आणि द्रौपदी स्वयंवर या भावमधुर आख्यानांनी मुक्तेश्वरा-सारख्या महाकवीलासुद्धा स्फूर्ती दिली आहे.[२]

जनाबाईच्या विचारांची पुढची पायरी चोखोबाच्या भगिनी निर्मलाने गाठली. तिने स्पष्टच म्हटले आहे की,

१. श्री स. सं. गा. पृ. ८९-९०.

२. नांदापुरकर, ना. गो. जनाबाई आणि मुक्तेश्वर, प्रो. पोतदार स्मारक ग्रंथ पुणे १९५०, पृ. १०९-११६.

अनुक्रमणिका

परमार्थाची गोडी लागल्यामुळे "संसाराचा छंद नकोसा झाला" अशी त्याची अवस्था झाली. त्या म्हणतात "सापडले संधी संसाराचे अंगी। सोडवी लगभगी मायबापा।।" ह्या अवस्थेतुन बाहेर पडल्यानंतर नाममंत्र जपाचे सोपे साधन त्याच्या हाती आले.

स्त्रियांच्या सामाजिक पिळवणुकी मागची महत्त्वाची दोन कारणे म्हणजे शिक्षणाचा व आर्थिक स्वातंत्र्याचा अभाव होय. प्रसिद्ध वैदर्भिय कवी राजशेखराने नव्या शतकातच लिहिले आहे की, महिलांचे शिक्षण राजन्य, ब्राह्मण आणि गणिका वर्गापुरते मर्यादित होते.[३] सामान्यतः मुलीचे उपनयन होत नसे. मुलगा मात्र उपनयनाने गुरुकुलात प्रवेश करून शिक्षण घेण्यास पात्र होत असे. अकराव्या शतकात विज्ञानेश्वराने याज्ञवल्क स्मृतीवर टीका करताना मिताक्षरात म्हटले आहे की, महिलांसाठी विवाह हाच उपनयनासारखा आहे आणि शुद्रासारखी निरक्षर असल्यामुळे स्त्रीला जप, तप, ध्यान, अध्ययनाचा अधिकारच नाही.[४]

मध्ययुगातील महिलेच्या संपत्तीच्या अधिकाराबद्दल फारशी माहिती नाही याबाबत त्या पुरुषाची बरोबरी करू शकत नाही, हे उघड आहे. तरी पण या काळात काही सुधारणा झाल्यासारखी वाटते. दायभागाने स्त्रीचा संपत्ती खरेदी-विक्री भोगाचा अधिकार मान्य केला आहे.[५] मिताक्षरानेही स्त्रीचा वारसाहक्क मान्य केला आहे. पण त्यासोबत स्पष्टीकरण दिले आहे की, स्त्री-संपत्तीचा उपभोग करू शकते पण विकू शकत नाही. त्यात असेही म्हटले आहे की, स्त्री धनाचा वारसा कन्या व नातीस असतो.[६] शहाजहानकालीन एका फर्मानात व-हाडातील दोन महिलांना संपत्तीचा वारसाहक्क व पुरोहिताचा व्यवसाय करण्याची परवानगी मिळाली असून त्याला समाजाची मान्यता मिळालेली दिसते.[७] जहांगीराच्या काळात नासिकच्या दोन महिलांनी ठाण्यात मुन्सफीकडून धर्माधिकारीपदाच्या वतनाची तकसीम मिळविली.[८]

पण सामान्यता दळण, कांडण, स्वैपाक या कामामुळे स्त्रियांचा समाजातील दर्जा ठरताना दिसते. वाती वळणे हा विधवा महिलांचा महत्त्वाचा उद्योग होता. सुतकताई व शिवणकाम, विणकाम ही पुढची पायरी होती. तामिलनाडूतील संगम ग्रंथात या महिलांना परूत्री पैडंगल म्हणजे कापूस महिला म्हटले आहे.[९] हा शब्द इंग्रजीतील स्पिन्स्टर म्हणजे निराश्रीत एकट्या महिलेसाठी वापरला जातो, तो जवळपास याच अर्थाच्या व्यवसायाच्या महिलांचा आहे. नागपूरचा रेसिडेन्ट रिचर्ड जेकिन्स यांनी शेतातील कापूस निवडण्याचे कार्य महिलांचे असल्याचे म्हटले आहे.[१०]

**महिला संत :–**

मध्ययुगीन मराठी महिला संत विषमतेच्या आणि कोंडवाड्याच्या वातावरणात जन्मास आल्या पण विचारवंत विद्वान आणि आध्यात्मिकदृष्ट्या प्रगत व्यक्ती म्हणून त्यांचे व्यक्तीत्त्व फुलारले. त्यांच्या जीवनातून आणि साहित्यातून त्यांचे व्यक्तीत्त्व प्रकट झाले. पत्नी, कन्या किंवा मातेच्या परंपरागत भूमिकांचा त्याग करून त्यांनी समाजाच्या व कुटूंबाच्या चौकटी मोडीत काढल्या. त्या त्यांचे विचारच नव्हे तर, विचार व्यक्त करण्याची त्यांची भूमिकाच विद्रोहाची आहे.

बहुतांश महिला संतांबद्दलची आपली माहिती अपुरी आहे. यांचे कारण पुरुष संतांप्रमाणे त्यांनी आपली शिष्य परंपरा चालविली नाही. त्यामुळे त्यांच्या जीवनवृत्ताचे

३. अल्तेकर ए. एस. द पोझीशन ऑफ वूमन इन हिंदू सिव्हीलायझेशन पृ. १९५.

४. मिताक्षर याज्ञवल्क स्मृतीवर विज्ञानेश्वराची टीका अनु. जे. आर. घारपुरे वारापारवाला, १९३६-५२, खंड १, श्लोक १५.

५. स्त्रीचा संपत्तीचा अधिकार आणि विधवेचा स्त्री धनाचा अधिकार यावर सामान्य चर्चा पां. वा. काणे यांच्या "हिस्ट्री ऑफ धर्मशास्त्र", खंड ३, पृ. ७००-४९ मध्ये आढळले (द्वितीय आवृत्ती १९७३.)

६. मिताक्षर उपरोक्त, अध्याय २, पृ. १३५,

७. कुलकर्णी. गं. त्र्य, सेटलमेंट ऑफ किस्प्युट ऑफ द व्हिलेज ऑफिशियल्स, ए स्टडी ऑफ ॲन अनुपब्लीशड फरमान ऑफ शाहजहान, इंडियन हिस्ट्री कॉंग्रेस, वारगल, सत्र १९९२-९३, पृ. १९९-२०४.

८. शिवचरित्र साहित्य, खंड २ रे. २९०.

९. विजय रामस्वामी : आस्पेटकस ऑफ बूमेन ॲड वर्क, आय. इ. एस. एच. आर., पृ. ८५-८६.

१०. जेकिन्स, खंड १, पृ. ४२.

आणि साहित्याचे रक्षण झाले नाही. त्यांच्यात वेणूबाईचा अपवाद आहे. त्यांनी रामदासाचे शिष्यत्त्व पत्करून पुढे मठाधिपतीचेही कार्य केले. हे क्रांतिकारकच मानायला हवे.

महाराष्ट्रीय महिला संतांच्या सामाजिक पार्श्वभूमीचे विश्लेषण पुढे तालिकेत सादर केले आहे. त्या सर्व वैष्णव होत्या. त्यांची संख्या २५ असून त्यात ब्राह्मणांची संख्या १४ आहे. यांचे प्रमाण ५६ टक्के असून समाजाच्या विशिष्ट वर्गातील होत्या. त्यांना शिक्षणाची परंपरा होती. मुक्ताबाई तर ज्ञानेश्वरासारख्या विद्वान पुरुषाची बहिण होती.

शुद्र अस्पृश्य संतांचे प्रमाण ४४ टक्के होते. त्यांना

**तालिका**

**मराठी महिला संत**[११]

| नाव | शतक | जात | संप्रदाय | शेरा |
|---|---|---|---|---|
| मुक्ताबाई | १३ | ब्राह्मण | विठ्ठल | ज्ञानेश्वरादी भावंडाची बहिण |
| जनाबाई | १३ | शुद्र | विठ्ठल | नामदेवाची दासी |
| कान्होपात्रा | १३ | देवदासी | विठ्ठल | - - - - - |
| राजाई | १३ | शुद्र | विठ्ठल | नामदेवाची पत्नी |
| गोणाई | १३ | शुद्र | विठ्ठल | नामदेवाची कन्या |
| महदाईसा | १३ | ब्राह्मण | महानुभाव | - - - - - |
| नागांबिका | १३ | ब्राह्मण | महानुभाव | नामदेवाचार्यांची नात |
| नागाईसा | १३ | ब्राह्मण | महानुभाव | बालविधवा |
| नागरी नागी | १४ | शुद्र | विठ्ठल | नामदेवाची दासी |
| देमाइसा | १४ | - - - | महानुभाव | - - - - - |
| सोयराबाई | १४ | महार | विठ्ठल | चोखामेळ्याची पत्नी |
| निर्मला | १४ | महार | विठ्ठल | चोखामेळ्याची बहिण |
| बेहनाबाई | १७ | ब्राह्मण | विठ्ठल | कुलकर्णीची पत्नी |
| वेजाबाई | १७ | ब्राह्मण | राम | बालविधवा |
| अक्काबाई | १७ | ब्राह्मण | राम | बालविधवा |
| बयाबाई | १७ | ब्राह्मण | राम | रामदासी शिष्या |
| अंबाबाई | १७ | ब्राह्मण | - - - | रामदासी शिष्या |
| गंगाबाई | १७ | ब्राह्मण | नाथ संप्रदाय | रामदासी शिष्या |
| जयतिका | १७ | - - - | - - - | - - - - - |
| हंसाबीका | १७ | - - - | महानुभाव | - - - - - |
| पार्वतीबाई | १७ | ब्राह्मण | मुकुंदराज | स्वामी शिवबोधाच्या पत्नी |
| प्रेमाबाई | १७ | ब्राह्मण | कृष्ण | बालविधवा |
| मिनाक्षीअम्मा | १७ | ब्राह्मण | कृष्ण | वासुदेवा पंडिताची पत्नी |
| राधाबाई | १७ | ब्राह्मण | स्वामी परंपरा | मुडलगी अद्वय बोधाची पत्नी |
| विठाबाई | १८-१९ | - - - | विठाबाई | |

११. विजया रामस्वामी यांनी "अँकलेट ऑन द फिट" या शोध लेखात फक्त १२ महिला संतांची नांवे दिले आहे. (इंडियन हिस्टॉरिकल रिव्ह्यु खंड १७ अंक १-२ जुलै १९९०, जाने. १९९१)

पुस्तकी ज्ञान नसले तरी परंपरागत ज्ञान पुरुषांच्या बरोबरीचे होते. त्यांनी संस्कृतऐवजी मराठीतच रचना केली आणि देशज साहित्यात भर घातली.

एकाच कुटुंबातील बंधु भगिनींनी अध्यात्माचा मार्ग स्विकारला तरी परंपरेने पुरुषाला व स्त्रीला वेगवेगळा मार्ग दाखविला आहे. श्रेष्ठ वर्णातील पुरुषास चतुर्थाश्रमात संन्यास घेता येतो, तर ते स्त्री शुद्रास नाकारत आहे. ज्ञानेश्वरादी भावंडे संन्यस्त असली, तर मुक्ताबाईचा संन्यास प्रथमदर्शनी परंपरा धुडकावणारा आहे. मध्ययुगीन भक्ती आंदोलनाने या परंपरेच्या अडचणीतून मार्ग काढला. यामुळे रामदास सामान्यता परंपरावादी असले, तरी त्यांनी वेणाबाईसारख्या स्त्रीला, तेही विवाहित अन् विधवा स्त्रीला, दिक्षा देऊन किर्तन करण्याची अनुज्ञा केली व मिरज येथे स्वतंत्र मठ स्थापन करून दिला. मराठी महिला संत सामान्य रूपे वैष्णव असल्या, तरी त्यात राम, कृष्ण, विठ्ठल असे भेद आहेत.

वर्गीकरणाचा दुसरा प्रकार म्हणजे पुरुषांशी त्याचे संबंध याप्रकारे होय. ज्ञानेश्वरादी बंधुंची भगिनी मुक्ताबाई संन्यस्त होती. जनाबाई दासी, तर कान्होपात्रा देवदासी होती. बाकी सर्व महिला संत पत्नी, कन्या, विधवा या परंपरागत वर्गातील होत्या. बहिणाबाई ने म्हटले आहे की, कर्तव्यदक्ष पत्नी घरगुती कार्य व धार्मिक कर्तव्य एकाचवेळी पार पाडते. पत्नी ने आपल्या पतीच्या इच्छा पूर्ण केल्याच पाहिजे. मग त्यासाठी प्राण गेला तरी बेहतर, पत्नीने कधीही पतीची अवज्ञा करू नये. अशा स्त्रीचे कुल, जात आणि ती खुद्द धन्य होत.[१२]

उलटपक्षी महदंबेची चक्रधर स्वामींवर इतकी भक्ती होती की, वाराणशीस गेल्यास तिला स्वामीची आठवण होऊन "हे तीलांजली जाति गोत्रासी, हे दादोसासी असे म्हणून सर्वस्व त्याग केला. याच प्रकारची भक्ती समर्थ भक्ती वेणाबाई ने व्यक्त केली आहे." देहे माझे, मन माझे सर्व ते गुरू राजे।। यामुळे छिद्रान्वेषी लोकांच्या विषप्रयोगाच्या दिव्यातुनही जावे लागले. "हीन दीन अपराधी, वेणी म्हणे परि तुझी पावना रामा." ह्या पदावरून त्यांच्या भावास्थितीची कल्पना येते. जयंतिका हिने "सासुरवासिनी" असे रूपकपर पद लिहिले असून ते ल. दा. पांगारकरांनी छापले आहे.[१३] अनेक महिला संतांनी परमेश्वरासच आपला पती मानले असून शिष्यांना संतती मानले आहे. या श्रेणीत मुक्ताबाई, जनाबाई वगैरे येतात. तर सोयराबाई पती सेवेत दक्ष असून पारमार्थिक प्रवृत्तीच्या होत्या. त्यांनी स्वतःचा उल्लेख "चोख्याची महारी" असा केला असून चोखामेळ्याच्या मुत्यूनंतर "चोखा मेळविला रूपी। माझी याता कोण गती। असे भाव व्याकुळउद्‌गार काढले आहे. याउलट अंबाबाई ने "मी सद्‌गुरू घरची सैरी शोभते बरी" असे उघडपणे म्हटले आहे.[१४]

महिला संतांच्या काव्यात गुढ कल्पना चित्रण दिसून येते. मुक्ताबाई आपले आध्यात्मिक अनुभव चमत्कृती पूर्ण वर्णनाने रंगविण्यात कशी कुशल आहे यांची कल्पना पुढील अभंगावरून येईल.

"मुंगी उडाली आकाशी। तिने गिळीले सूर्यासी।
थोर नवलाव जाला। वांझे पुत्र प्रसवला।
विंचु पाताळासी जाय। शेष वंदी त्याचे पाय।
माशी व्याली घार जाली। देखुनी मुक्ताई हांसली।।"[१५]

ज्ञानेश्वराच्या आज्ञेने मुक्ताबाई ने चांगदेवास उपदेश दिला त्यातुन ती चांगदेवास स्वतःचा बाळ कल्पून त्याला ज्ञानांमृताने न्हाउ घालते. अव्यक्ताने विणलेल्या अविनाशी पाळण्यात टाकते त्याचे नामकरण करते. अनहत टाळी वाजऊन त्याला स्वं स्वरूपी निजवते व मनपवनाची दोरी हाती घेऊन त्याचा डोळा अलक्ष्यी स्थिर करते.[१६]

मुक्ताबाईचे व्यक्तिमत्त्व केवळ कोणाच्या अनुकरणातून साकार झाले नाही ते पूर्णपणे स्वतंत्र आहे. तिची ज्ञानावस्था इतकी पराकोटीला गेली आहे की, त्या अवस्थेत ती आपले स्त्रीत्त्व ही विसरलेली. तिच्या अभंगात कुठे

---

१२. पिरोज आनंदकर- बहिणाबाई स्वामी धनानंद आणि सरंजाम स्टिवाई बॅलेस (सं) वूमन सेंट ऑफ इस्ट अॅड वेस्ट (वेदान्त प्रेस कॅलिफोर्निया १९७९, प्रथम आवृत्ती लंदन १९५५) पृ. ७१-७२.

१३. म. वा. ह., खंड २३-४२, पृ. ५७८.

१४. भा. ई. स. म. इतिवृत्त शके १८३३, पृ. ९४.

१५. कित्ता, पृ. १७६, अभंग ४.

१६. आर. डी. रानडे, मिस्टीसिझम इन इंडिया पुणे. १९३३, पृ. २०६, अभंग १०.



अनुक्रमणिका

ही स्त्री भावाला प्राधान्य नाही. त्याचे रूपांतर निखळ मातृभावात झालेले आहे. उर्ध्वमुलं मधःशाखम् छंदांसी प्राहुर्ययम यातही असा या गुढ प्रकार दिसून येता.[१७] जनाबाई विठ्ठलास शिव्याशाप देऊन ही आपली भक्ती व्यक्त करते.

"विठ्या विठ्या आदिमायेचा कारटा, पत्नी झाली देवदासी शरीर झाले मृत"

जनाबाई घराच्या दारात उभी राहून तुला उलट-सुलट शिव्या देत आहे.[१८] जातीची बंधने ही महिला संतांना फारसे बंधनकारक वाटत नाही. बहीणाबाई ब्राह्मण आणि सामाजिक व शिष्टाचार काळजी कटचाने पाळणारी असून सुद्धा तुकाराम वाणी या शुद्राला गुरू म्हणून स्वीकार करते अर्थात येथे समाजाचे नियम मोडण्याची किंवा त्याचे रचनात्मक परिक्षण करण्याची बुद्धी दिसत नाही. त्याची कृतीच अधिक महत्त्वाची आहे.[१९]

जनाबाई अस्पृश्य असूनही चोखामेळा या अस्पृश्य संतावर देव बाटविल्याचा आरोप करते.[२०] देवाने त्याच्या अभंगामुळे त्याचे सेवकत्व स्वीकारून त्याच्या सोबत जेवण केले. चोखामेळ्याची बायको सोयराबाई (तिच्या ६२ ओव्या काळाच्या तडाख्यातुन बचावल्या आहेत.) शरीर शुद्ध किंवा अशुद्ध होऊ शकते, आत्मा निरंजन निरंकार असतो. शरीर मलिनतेन जाम होते तेव्हा शरीरातील दोष पवित्र शुद्ध होऊ शकतात पण अशुद्धी शरीरातच असते, आत्म्याला त्याचा स्पर्श नसतो.[२१]

महिला संतांच्या व्यक्तिमत्त्वात व प्रभावात बरीच विविधता दिसते. मध्ययुगीन समाजाच्या पूर्वग्रहामुळे समाजाच्या उच्च श्रेणीने त्यांच्या विचाराचा गांभीर्याने विचार केला नाही. त्यांचे श्रोते बहुधा तेली, तांबोळी, कुणबी होत. तरी सापेक्षता मुक्ताबाई आणि वेणाबाई अधिक प्रभावी ठरल्या. महदाईला, तर समाजाचा बहिष्कारच सहन करावा लागला. याचे कारण तिच्या महानुभाव संप्रदायाबद्दलचा समाजाचा सर्वसाधारण पूर्वग्रह होय महानुभावाचे साहित्य वाचणे किंवा गाणे म्हणजे चातुर्वर्णाविरुद्ध बंडाळीच मानली जात होती.

हिंदुत्वाच्या धार्मिक चौकटीत या महिला संत कुठे बसतात? ज्ञानेश्वर, मुक्ताबाई आणि भावडांचा छळ प्रसिद्धच आहे. मुक्ताबाईने तात्काळ समाधी स्विकारली असे मानले जाते. मुक्ताबाई व वेणाबाईने गुरू परंपरा स्विकारून शिष्य परंपरा चालविली. आधुनिक काळात बंडखोर महिलांपेक्षा बंडखोर पुरुष संत अधिक स्विकारणीय आहेत. हे लक्षणीय आहे त्यामुळे त्यांचे क्रांतीकारकत्व मवाळ होते अशी कल्पना असावी. भारतीय समाजाची पुरुषप्रधानता त्यातील ऐतिहासिक रचनात्मक बदलानेही सनातनी आणि पुराणमतवादी दृष्टिकोनास पाठबळ दिले असावे.

❖❖❖

---

१७. कुप्प्युस्वामी, सुशीला, मुक्ताबाई एक स्वरूप दर्शन, प्रतिष्टान, जुलै १९६७ पृ. १२.

१८. रानडे कित्रा, पृ. २०६, अभंग १०.

१९. मानुषी दशवार्षिक, अनु. ५०-५१-५२, १८८९ प्रस्तावना पृ. ७.

२०. वी. जी. खेर, महाराष्ट्र वूमन सेंट ऑफ ईस्ट ॲंड वेस्ट पृ. ५८.

२१. कित्ता, पृ. ६२.

# पहिल्या महायुद्धातील जगू गोडबोले प्रकरण

अवनीश पाटील

**प्रस्तावना**

बरोबर शंभर वर्षापूर्वी युरोप मध्ये पहिले महायुद्ध सुरू होते. ११ लाख भारतीय सैनिकांनी युद्धामध्ये भाग घेतला होता. युद्ध संपेपर्यंत ६०,००० भारतीय सैनिक मृत्यूमुखी पडले व ९२०० सैनिकांना त्यांच्या पराक्रमासाठी गौरविण्यात आले. ४ ऑगस्ट १९१४ रोजी जर्मनीने बेल्जियम वर आक्रमण केल्यावर ब्रिटनने युद्ध पुकारले होते. ऑगस्ट महिन्याच्या शेवटी भारतीय पायदळ व घोडदळ सैनिकांच्या तुकड्या फ्रांसला रवाना झाल्या. ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांमध्ये बहुतेक भारतीय सैनिकांना फ्रांसच्या गीवेनची-न्यूवी चॅपेल परिसरामध्ये गोळा करण्यात आले होते. ह्या परिसरामध्ये ते पुढील १४ महिने तळ ठोकून होते. १० ते १२ मार्च रोजी झालेल्या न्यूवी चॅपेलच्या लढाईत भारतीय सैनिकांची प्रचंड जीवहानी झाली. एप्रिल १९१५ मध्ये त्यांनी येप्रसच्या दुस-या लढाईत भाग घेतला. सप्टेंबर १९१५ मध्ये त्यांनी लूस येथे युद्ध केले. १९१६ च्या जानेवारी महिन्यात भारतीय सैनिकांना मेसोपोटेमियाला पाठवले गेले. भारतीय सैनिकांचे फ्रांस मधील वास्तव्य सुमारे दीड वर्ष (ऑगस्ट १९१४ ते जानेवारी १९१६) होते.

फ्रांस मधील लढायांमध्ये मोठ्या संख्येने भारतीय सैनिक मृत्यूमुखी पडले. अनेक सैनिक जखमी झाले. फ्रांस मध्ये जखमी व आजारी भारतीय सैनिकांची काळजी घेण्यासाठी सोयी नसल्यामुळे त्यांच्यासाठी इंग्लंडमध्ये खास रुग्णालये स्थापन करण्यात आली होती. त्यामुळे इंग्लंड मध्येदेखील विशेषतः जखमी व आजारी सैनिकांचे बराच काळ वास्तव्य होते. इंग्लंड मधील ब्रायटन या ठिकाणी तीन मोठी रुग्णालये स्थापन केली होती. ह्या रुग्णालयात भारतीय वैद्यकीय सेवेचे (Indian Medical Service) काही युरोपीयन व भारतीय अधिकारी आणि सेवक वर्ग जखमी सैनिकांची काळजी घेत होते.

जर्मनीला हरवण्यासाठी प्रचंड प्रमाणात रक्त सांडणा-या भारतीय सैनिकांचे योगदान व शौर्य याचे अनेक इतिहास लिहिले गेले. युद्ध संपल्यावर भारतीय सैनिकांचे फ्रांस मध्ये नेतृत्व करणा-या सर जेम्स विलकॉक्स या ब्रिटीश जनरलने भारतीय सैनिकांच्या युद्ध कामगिरीचा गौरवशाली इतिहास लिहीला.[१] मात्र अशा प्रकारच्या इतिहासांमध्ये सैनिकांच्या युद्धभूमीतील कर्तृत्वाचा आढावा घेतला असला तरी त्यांच्या अनुभवांचे कथन क्वचितच केलेले आढळते. भारतीय सैनिकांनी निमूटपणे महायुद्धात भाग घेतला नव्हता. त्यांनी हजारो पत्रे लिहिली होती व त्यांना हजारो पत्रे मिळाली देखील होती. ह्या पत्रांमध्ये सैनिकांनी त्यांच्या युद्धाबद्दलच्या भावना, प्रतिक्रिया, प्रश्न व अडचणी व्यक्त केलेल्या आढळतात.[२]

भारतीय सैनिकांनी लिहिलेल्या पत्रांमध्ये इंग्लंडमधील ब्रायटन येथे खास भारतीय सैनिकांसाठी स्थापन केलेल्या रुग्णालयात घडलेली एक घटना आढळते. १९१५ सालच्या नोव्हेंबर महिन्यात रुग्णालयातील वैद्यकीय शाखेमध्ये काम करणारा असिस्टंट सब-सर्जन जगू गोडबोले यांनी रुग्णालयाचे प्रमुख कर्नल डॉ. ब्रूस सिटन यांना गोळी घालून ठार मारण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. जगू गोडबोलेला त्याने केलेल्या गुन्ह्यासाठी ७ वर्षे सक्त मजुरीची शिक्षा झाली.

प्रस्तुत लेखामध्ये ह्या एका घटनेचा सूक्ष्म अभ्यास करून भारतीय सैनिकांना परकीय भूमीवर आलेले अनुभव, त्यांचे प्रश्न आणि त्यांना ब्रिटीश सत्ताधीशांकडून मिळालेली वागणूक समजून घेण्याचा प्रयत्न केला आहे. दुसरे, हा लेख जगू गोडबोले ह्या व्यक्तीला इंग्लंड मधील त्याच्या वास्तव्यात आलेले अनुभव समजून घेऊन पहिल्या महायुद्धातील भारतीय सैनिकांच्या परिस्थितीवर प्रकाश टाकण्याचा प्रयास करतो. हा लेख एकाच वेळेस जगू गोडबोलेची गोष्ट व भारतीय सैनिकांच्या इंग्लंडमधील परिस्थितीबद्दल ऐतिहासिक लिखाण देखील आहे.

शोधनिबंधाचा विषय असलेली घटना ह्यासाठी

असामान्य आहे की घटनेमधील प्रमुखपात्र जगू गोडबोले यांनी घटना घडण्याच्या आधी व नंतर लिहिलेली पाच पत्रे आपल्याला उपलब्ध आहेत. जगू गोडबोलेची पत्रे भारतीय सैनिकांच्या परिस्थितीवर काय प्रकाश टाकतात हे समजून घेण्यापूर्वी हा प्रश्न विचारणे योग्य होईल- एखाद्या सामान्य व्यक्तिच्या आचार व विचारांना इतिहास लेखनात काय महत्त्व आहे? ज्या काळात पहिल्या महायुद्धातील भारतीय सैनिकांची गौरवशाली कामगिरी पुढे आणण्यासाठी भव्य संशोधन प्रकल्प हाती घेतले जात आहेत त्या काळात वैद्यकीय शाखेमधील साधारण व्यक्तीवर सूक्ष्म संशोधन करणे विरोधाभासी व असंगत वाटू शकते. पण जर ऐतिहासिक साधने आपल्याला सामान्य लोकांच्या इतिहासाप्रमाणे एखाद्या साधारण व्यक्तीचा इतिहास लिहिण्याची संधी उपलब्ध करून देत असतील तर त्याच्याकडे दुर्लक्ष करणे मुर्खपणाचे ठरेल. 'व्यक्ती' ह्या संकल्पनेचा विस्तार सामान्य लोकांच्या इतिहासाच्या दिशेने करणे अत्यंत लाभदायक ठरू शकते. काही सूक्ष्मलक्षीय इतिहासकारांनी (Microhistorians) हे दाखवून दिले आहे की, कोणतेही महत्त्व नसलेल्या सामान्य व्यक्तीचा अभ्यास एका ठराविक ऐतिहासिक कालखंडात एखाद्या सामाजिक समूहाच्या अथवा व्यावसायिक गटाच्या वैशिष्ट्यांवर प्रकाश टाकू शकतो.[३] ही सामान्य व्यक्ती महत्त्वाची नसल्यामुळेच एखाद्या सामाजिक किंवा व्यावसायिक गटाचा प्रतिनिधी असते हे आपण लक्षात ठेवले पाहिजे.

जगू गोडबोलेचे उदाहरण पहिल्या महायुद्धात सहभागी झालेल्या सर्वसामान्य सैनिकांचे प्रतिनिधित्व करणारे आहे का? कदापि नाही. जगू गोडबोले ह्याला पहिल्या महायुद्धातील सर्वसामान्य भारतीय सैनिकाचे प्रारूपिक उदाहरण मानता येणार नाही. तो काही युद्धात लढणारा सैनिक नव्हता तर वैद्यकीय शाखेमध्ये कनिष्ठ दर्जाचा असिस्टंट सब-सर्जन होता. तो ब्राह्मण जातीचा व सुशिक्षित होता. गोडबोले इतर सैनिकांपेक्षा वेगळा असला तरी त्याच्या वेगळेपणाला काही मर्यादा होत्या. त्याने लिहिलेल्या पत्रांमध्ये गोडबोलेने सर्व सामान्य सैनिकांच्या प्रश्नांना वाचा फोडली. त्यामुळे आपल्याला असे म्हणता येईल की, जगू गोडबोलेचे उदाहरण हे मर्यादित स्वरूपात भारतीय सैनिकांचे प्रतिनिधित्व करणारे होते. प्रसिद्ध सूक्ष्मलक्षीय इतिहासकार कार्लो गिंझबर्ग म्हणतात त्याप्रमाणे एखादे मर्यादित उदाहरणदेखील सकारात्मक व नकारात्मक अर्थाने प्रातिनिधिक होऊ शकते. ते नकारात्मक अर्थाने प्रातिनिधिक असते कारण ते आपल्या एखाद्या विशिष्ट परिस्थितीत इतिहासकाराने काय समजून घेतले पाहिजे ह्याची दिशा देते. तेच उदाहरण सकारात्मक अर्थाने प्रातिनिधिक असते कारण त्याच्यामुळे आपल्याला एखाद्या कालखंडातील एखाद्या गटाच्या अथवा समूहाच्या विचारांच्या सुप्त शक्यतांची व्याख्या करण्याची संधी मिळते.

**भारतीय सैनिकांचे दडपशाहीचे दप्तर**

युरोपमध्ये तळ असताना भारतीय सैनिकांनी हजारो पत्र लिहिली. भारतीय सैनिकांनी व अधिका-यांनी लिहिलेल्या पत्रांचे ब्रिटीश प्रशासनाद्वारे परीक्षण केले जात असे. हे करण्यासाठी परिनिरिक्षक (Censors) नेमले गेले होते. हे परिनिरीक्षक पत्रांमधील महत्त्वाचा अथवा आक्षेपार्ह मजकूर शोधून प्रत्येक आठवड्याला एक अहवाल तयार करत असत व तो सर्वोच्च लष्करी व प्रशासकीय अधिका-यांना पाठवत असत. आठवड्याच्या अहवालांमध्ये भारतीय सैनिकांच्या पत्रातील भरपूर मजकूर असलेले उतारे पुनर्मुद्रित केले जात असत. ह्या अहवालांचे अवलोकन केल्यावर आपल्याला भारतीय सैनिकांचे विचार, भावना व अनुभव कळतात. प्रत्येक पत्रात तपशीलाचे प्रमाण वेगवेगळे होते व पत्र लिहिणा-या सैनिकाचे नाव, जात, भाषा आणि पत्र कधी व कोणाला पाठवले होते याचा उल्लेख नेहमीच केलेला आढळतो. कार्लो गिंझबर्ग अशा प्रकारच्या ऐतिहासिक कागदपत्रांना 'दडपशाहीची दप्तरे' (Archives of the Repr-ession) म्हणतात कारण ती मुळात सामाजिक नियंत्रण करणा-या सत्ताधीशांनी निर्माण केलेली असतात.[४] भारतीय सैनिकांच्या पहिल्या महायुद्धातील सहभागासंबंधित बहुतांश कागदपत्रे ब्रिटीश अधिका-यांनी तयार केली व जपून ठेवली आहेत. पण असे असले तरी याच दडपशाहीच्या दप्तरांमध्ये आपल्याला ज्यांनी दडपले आले अशा व्यक्तींची माहिती सापडते. याचे प्रमुख कारण हेच असते की, सत्ताधीश वर्गाला नियंत्रण निर्माण करण्याच्या प्रक्रियेत ज्यांच्यावर

नियंत्रण करायचे आहे अशा लोकांचे शब्द, विचार व कृत्य इच्छा नसतानाही नोंदवावी लागतात.

परिनिरीक्षकांचे अहवाल जरी महत्त्वाची ऐतिहासिक साधने असली तरी त्यांचे साधन म्हणून काही मर्यादा आहेत. आपण एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की आज आपल्याला सैनिकांच्या पत्राचे अवलोकन यासाठी करता येते कारण त्यांचे परिनिरीक्षकाद्वारे अभ्यवेक्षण (सेन्सॉरशिप) केले गेले होते. म्हणूनच ह्या पत्रांमध्ये आपल्याला अशी पत्रे सापडतात ज्यातील आक्षेपार्ह मजकूर ब्रिटीश अधिका-यांना भारतात पोचू नये असे वाटत होते. ज्या पत्रांमध्ये लष्करी माहिती, युद्धासंबंधी हताशपणा, युरोपियन स्त्रियांबद्दलची मते, अमलीपदार्थांचा संदर्भ, इंग्लंड मधील वाईट वागणूक आणि गो-या लोकांबद्दल अपमानास्पद उल्लेख असेल अशा पत्रांना बाहेर काढले जात असे आणि त्यातील मजकूर अहवालात लिहिला जात असे. थोडक्यात परिनिरीक्षकांना महत्त्वाचा अथवा आक्षेपार्ह वाटणारा मजकूर या अहवालांमध्ये आपल्याला सापडतो. दुसरी मर्यादा ही होती की, भारतीय सैनिक आपली पत्र हिंदी, मराठी, उर्दू इत्यादी प्रादेशिक भाषांमध्ये लिहित असत. त्यांनी लिहिलेल्या मजकुराचे इंग्रजीत भाषांतर करून ह्या अहवालांमध्ये समाविष्ट केले जात असे. पत्रांमधील मजकुरावर भाषांतराची प्रक्रिया केल्यामुळे मात्र मजकुराचा सैनिकांना अपेक्षित असलेला अर्थ इतिहासकार गमावण्याची संभावना निर्माण होते.

### जगू गोडबोले कोण होता?

ब्रिटीश प्रशासनाने भारतीय सैनिकांवर नियंत्रण निर्माण करण्यासाठी निर्माण केलेल्या ह्या दडपशाहीच्या दप्तरामध्ये आपल्याला जगू गोडबोले यांची पत्रे सापडतात. परीनिरीक्षकांच्या अहवालात गोडबोलेची पाच पत्रे उपलब्ध आहेत व त्याच्या पत्रांमधील मजकूरदेखील इतर पत्रांच्या तुलनेत थोडा अधिक आहे. याशिवाय इतर सैनिकांच्या एक-दोन पत्रांमध्ये जगू गोडबोले प्रकरणाच्या संदर्भात मजकूर आढळतो. जगू गोडबोलेने ही पत्रे रत्नागिरी जिल्ह्यातील दापोली येथे राहणा-या सीताराम हरी गोडबोले यांना लिहिलेली होती. सीताराम हे जगूचे बंधू असण्याची दाट शक्यता आहे कारण, काही पत्रांमध्ये जगूचा उल्लेख 'जे. एच. गोडबोले' असा आढळतो. 'एच' हे अक्षर त्यांच्या वडिलांचे नाव 'हरी'चे प्रतिनिधित्व करत असावे असे वाटते. जगूने आपल्या पत्रांमध्ये सीतारामला वारंवार लिहिले आहे की, त्याची काळजी करू नये व त्याच्यामुळे सीतारामवर जो खर्चाचा भार पडला याचे त्याला दुःख होत आहे. यावरून असे वाटते की, सीताराम हे जगूचे थोरले बंधू होते. जगू हा हिंदू शास्त्र जाणणारा पारंपारिक ब्राह्मण जातीची व्यक्ती होता. परिनिरीक्षकाने एके ठिकाणी जगूने आपल्या पत्रात शास्त्रांमधील कडवी लिहिली होती असे म्हंटले आहे. एका पत्रामध्ये जगू भगवत्गीता वाचून वेळ घालवत होता असा देखील उल्लेख आहे. तो अविवाहित होता कारण, एका पत्रामध्ये 'मी आजपर्यंत ब्रह्मचारी जीवन जगलो असा उल्लेख आहे.'

जगूने पत्रे दोन ठिकाणांहून लिहिलेली होती. १९१५ मध्ये ऑगस्ट-सप्टेंबर महिन्यातील दोन पत्र ही माऊंट डोर हॉस्पीटल बूर्नमथ (Mount Dore Hospital, Bournemouth) येथून लिहिलेली होती आणि नोव्हेंबर - डिसेंबरमधील तीन पत्र ब्रायटन येथील रुग्णालयातून लिहिलेली होती. यावरून असे दिसते की, बूर्नमथमधील रुग्णालयातून जगूची बदली साधारणपणे १९१५ सालच्या ऑक्टोबर महिन्यामध्ये ब्रायटन रुग्णालयात झाली असणार.

### भारतीय सैनिकांचे स्वागत

जगू गोडबोलेचे पहिले पत्र बूर्नमथमधील रुग्णालयातून २३ जून १९१५ रोजी लिहिले होते. ह्या पत्रामध्ये तो इंग्लंड मधील लोकांनी भारतीय सैनिकांना दिलेल्या चांगल्या वागणूकीचा उल्लेख करतो. पहिल्या महायुद्धाच्या काळात इंग्लंडच्या मदतील धाऊन आलेल्या भारतीय सैनिकांच्याप्रती स्थानिक लोकांच्या मनात आदर, आपुलकी व कुतूहल होते, असे जगूच्या पत्रावरून दिसते. तो लिहितो :

> सध्याच्या परिस्थितीमध्ये जो कोणी भारतीय असेल तो येथे महत्त्वाचा झाला आहे. येथील लोकांना भारतातून येणारी कोणतीही गोष्ट आवडते. एवढेच काय येथील लोकांनी आमच्या कोटाची बटणे सुद्धा घेतली आहेत. येथील लोक विशेषतः स्त्रिया जेव्हा जवानांना रस्त्यावर भेटतात तेव्हा ते त्यांच्याकडून कोटाची बटणे मागतात आणि बटण दिले तर त्यांना बक्षीस देतात. बटण मिळाल्यानंतर ते गळ्यात किंवा छातीवर अडकवले जाते व त्याचे प्रदर्शन










करत स्थानिक लोक रस्त्यावर फिरतात (IOR/

L/MIL/5/826/4,f. 122r).[५]

दुस-या एका पत्रामध्ये जगूने इग्लंड मध्ये खाकी कपड्यांना मिळत असलेल्या महत्त्वाबद्दल लिहिले आहे :

> आम्ही नेहमी गणवेश का धारण करतो? कारण हा आदेश आहे की खाकी कपडे नेहमी घातले पाहिजेत. हा नियम फक्त आम्हाला लागू नाही तर, अधिकारी पदाच्या खालील सर्वांना लागू आहे. याचा फायदा हा आहे की, कोण लष्करात आहे? आणि कोण नाही? हे कळते आणि ज्यांचे (लष्करात येण्यासाठी) मन मागेपुढे करत आहे ते आपले मन बनवतील. अलीकडच्या काळात खाकी रंगाला फार आदर मिळाला आहे. हे पाहून अशी आशा केली जाते की, जे खाकी वस्त्र धारण करत नाहीत त्यांना ते धारण करण्याची इच्छा निर्माण हाईल आणि ते लष्करात तातडीने भरती होतील. ह्या भागातील मुली हे खाकी कपडे धारण केलेल्या पुरुषांचीच काळजी करतात आणि जर एखादी मुलगी खाकी वस्त्रात नसलेल्या पुरुषाबरोबर बाहेर गेली तर इतर मुली तिच्या बरोबर शत्रुत्व पत्करतात (IOR/L/MIL/5/825/8, f.26v, f.27v, f.28v).

जगू गोडबोलेने आपल्या पत्रांमध्ये इंग्लंड मधील सामान्य लोकांबद्दल निरीक्षणे नोंदवली आहेत. त्याने एक महत्त्वाचे निरीक्षण इंग्लंडमधील सामान्य लोकांच्या राहणीमानाबद्दल केले आहे. तो लिहितो :

> या देशातील गरीब लोक चांगले कपडे वापरतात कारण त्यांना तसे करणे खरोखर परवडते. एक लहान मजुरी करणा-या मुलाला प्रत्येक आठवड्याला १५ शिलिंग म्हणजेच १२ रुपये आणि महिन्याला ५० रुपये दिले तर, त्याने ४० रुपयोची बचत केली असती किंवा दारू अथवा जुगारात खर्च केले असते. त्याने असे म्हंटले असते "कपडे घेण्यात काय लाभ आहे?...." (IOR/L/MIL/5/826/1, f.23r, f.23v, f.24r, f.24v)..नंतर जगूने हे नमूद केले होते की इंग्लंडमध्ये भिकारी व जात व्यवस्था अस्तित्वात नाहीत. मात्र याबद्दलचा मजकूर परिनिरीक्षकाने वगळल्यामुळे आपल्याला उपलब्ध नाही.

जगू हा इंग्लंडमधील स्थानिक लोकांनी भारतीय लोकांना दिलेली वागणूक पाहून प्रभावित झाला होता. तो लिहितो "लोकांची वागणूक चांगली आहे आणि लोक इतक्या प्रेमाने व आदराने बोलतात की जर त्यांची नक्कल केली तर, आपल्याला लाज वाटते. येथील पोलीस धमकावत नाहीत. एका रात्री मी समुद्रकिना-यावर जात असतांना पोलीस आले आणि मला म्हणाले सर, तुम्ही पुढे जाऊ शकत नाही." जगूने लिहिलेल्या ह्या वाक्यांवरून आपल्याला हा प्रत्यय येतो की, भारतामधील ब्रिटीश अधिकारी आणि पोलीस यांच्याकडून मिळालेल्या हीन वागणुकीच्या तुलनेत इंग्लंडमधील लोकांनी दिलेली मानाची वागणूक त्याला लक्षणीय वाटणे साहजिकच होते (IOR/L/MIL/5/825/5, f.30v, f.31r). जगू गोडबोले हा आपल्या पत्रांमध्ये निव्वळ निरीक्षणे करून थांबणा-या व्यक्तींपैकी एक नव्हता. त्याने इंग्लंडमधील परिस्थितीची तुलना भारतामधील परिस्थितीशी केली व आपल्या क्षमतेनुसार कारणमीमांसा करण्याचा प्रयत्न देखील केला.

**इंग्लंड मधील लोकांचे धर्म व नैतिकता**

आपल्याला जगू गोडबोलेची तुलना व कारणमीमांसा करण्याच्या क्षमतेची प्रचिती त्याच्या २१ ऑगस्ट १९१५ रोजी लिहीलेल्या पत्रात येते. ह्या लांबलचक पत्रामध्ये जगू गोडबोलेने इंग्लंडमधील लोकांच्या धार्मिक रीतीरिवाजांचे वर्णन केले आहे. जगूला इग्लंडमध्ये हे जाणवले की येथील लोक धार्मिक बार्बीकडे फार कमी ध्यान देतात. चर्चला जाणा-या लोकांमध्ये बहुतेक स्त्रिया व त्यांची लहान मुलेच असतात. तो लिहितो "ज्याप्रमाणे भारतामध्ये वृद्ध स्त्रिया आपल्याला लोकांनी चांगले म्हणावे म्हणून (मंदिरात) जातात त्याच कारणासाठी येथील स्त्रिया चर्चला जातात ... तरुण मुले, तरुण मुली बघण्यासाठी जातात." (IOR/L/MIL/5/825/5, f.30v, f.31r).

अंधश्रद्धेबाबत जगूला भारत व इंग्लंडमधील लोकांमध्ये साम्य आढळले होते. त्यांच्यामते भारतासारखीच अंधश्रद्धा इंग्लंडमध्ये सुद्धा अस्तित्वात होती, मात्र ती तीव्र स्वरूपात नव्हती. इंग्लंड मधील काही लोकांना भविष्य जाणून घेण्याची इच्छा असल्यामुळे ते भविष्य










सांगणारे 'रॉयल फॉर्चून टेलर' सारखे ग्रंथ वाचतात, असे जगूने लिहिले आहे.

पत्रांमध्ये जगू गोडबोलेने केलेले इंग्रजी लोकांच्या नैतिकतेचे विवेचन लक्षणीय आहे. याबद्दल तो लिहितो :

> नैतिकतेचा प्रश्न हा सर्वात अवघड आहे, तो प्रत्येक व्यक्तीवर अवलंबून असतो. हजारो लोकांच्या उपस्थितीत तरुण पुरुष आणि मुली एकमेकांना आलिंगन देतात व समुद्रकिना-यावर एकमेकांसोबत पहुडलेले असतात. पण ह्यात काहीही गैर समजले जात नाही. मी हे सारखे पाहत असतो. एखाद्या मुलीला फिरायला जाण्यासाठी विचारणे अपराध मानला जात नाही, मुलींना हातात हात घेऊन फिरायला आवडते. ही विधाने १६ ते ३० वर्षे वय असलेल्या मुलींबद्दल आहेत (IOR/L/MIL/5/825/5, f.30v, f.31r).

भारतामध्ये वाढलेल्या एका पारंपरिक ब्राह्मण कुटुंबातील जगूला इंग्रजी तरुण - तरुणींच्या खुल्या वागणुकीबद्दल कुतूहल नक्कीच वाटले असणार. पण त्याने इंग्रजी लोकांच्या ह्या तथाकथित "सैल नैतिक वर्तनाबद्दल" तिरस्कारयुक्त भावना व्यक्त केल्या नाहीत. उलट त्याने याचे समर्थन केले. तो आपले बंधू सीताराम यांना लिहितो :

> तुम्हाला असे वाटते की आपली नैतिकता ही इंग्रजांच्या पेक्षा उच्च आहे, पण माझा दृष्टीकोण उलट आहे. आपल्या मध्ये आवेश दडपून ठेवणे हा नैतिकतेचा पाया मानला जातो. मात्र असे करण्याची शक्ती सर्वांकडे असते असे नाही; काही जणांना हे शक्य असते आणि आपल्या मधील बहुतेकजण आवेश-युक्त असतात. पण सर्वांना आपण नैतिक आहोत असे ओळखले जाण्याची इच्छा असते. याचा परिणाम असा होतो की आपल्या मध्ये अभिलाषा असताना आपण नैतिकतेचा मुखवटा घेऊन ढोंग करत असतो. येथील लोकांबद्दल मी एक उदाहरण देतो. येथील लोकांची युद्धावर जातांना अथवा दूरवरच्या प्रवासाला जाताना एक गाणे म्हणण्याची प्रथा आहे - "टिप्पेरीला जाण्याचा रस्ता दूर आहे, दूरवर जायचे आहे. मला माहीत असलेल्या सर्वात गोड मुलीकडे जाण्याचा रस्ता दूरचा आहे." ("Its a long way to Tipperary, its a long way to go. It's a long way to the sweetest girl I know.") आपल्या मनाची ओढ नैसर्गिकरित्या आपण ज्याच्यावर प्रेम करतो त्याच्याकडे असते. हे इंग्रजी गाणे ही भावना प्रतिबिंबित करते. आपण लगेचच असे म्हणू "तुम्ही किती मूर्ख आहात, युद्धावर जाण्याच्या वेळेस देवाच्या ऐवजी स्त्रीचे नाव घेत आहात.' ह्या भीतीमुळे आपण 'सर्वात गोड मुलगी' या शब्दांच्या ऐवजी पांडुरंग किंवा दुस-या कोणत्यातरी देवाचे नाव घेऊ. म्हणजेच आपण आपल्या स्त्रियांचा विचार करताना आपण ढोंग करून आपल्या गाण्यामध्ये देवाचे नाव घेऊ. ह्या गोष्टीला नैतिक कसे म्हणता येईल? (IOR/L/MIL/5/826/1, f.23r, f.23v, f.24r, f. 24v).

भारतीय लोकांमधील दुटप्पी नैतिक वर्तनाचे जगू गोडबोलेने आपल्या पत्रात आणखी एक उदाहरण दिले आहे. भारतात तरुण पुरुष गुप्तरित्या धुम्रपान करतात आणि इंग्लंड मध्ये ते खुल्या रितीने केले जाते.

जगू आपल्या पत्रात हे मत व्यक्त करतो की, भारतीय लोक हे नैतिकतेला शेवटच्या टोकापर्यंत ताणतात. ते ताठर नैतिक वर्तनाला प्राधान्य देतात. त्याला असे कदापि वाटत नाही की, सर्व लोक अनैतिक आहेत आणि एका पेक्षा जास्त स्त्रियांशी संबंध ठेवणे किंवा धूम्रपान करणे नैतिक आहे. त्याची खंत ही आहे की भारतीय लोक अशा नैतिकतेला अवाजवी व जरुरीपेक्षा जास्त महत्त्व देतात. जगूचे मत आहे की इंग्लंड मध्ये जी परिस्थिती आहे तशी भूतकाळात भारतामध्ये अस्तित्वात होती. ह्याचा पुरावा म्हणून तो "दुष्यंतराजा व बाण कवीच्या लग्नाची गोष्ट" ह्या लेखनाचा पुरावा देतो. थोडक्यात, जगू गोडबोले हे सुचवत आहे की, इंग्लंड मधील तरुण-तरुणींच्या मोकळ्या वर्तनाप्रमाणे भूतकाळात भारतीय लोक वर्तन करत होते. मग ही परिस्थिती कशी काय बदलली?

ह्या प्रश्नाचे साधे उत्तर जगू देतो : "कालांतराने चांगले काही करायला नसल्यामुळे भारतात नैतिकतेची पद्धत सुरू केली गेली." पुढे तो हे मत मांडतो की,

अशाच प्रकारची प्रक्रिया करणा-या शक्ती इंग्लंडमध्ये देखील कार्यरत आहेत आणि इंग्लंड भारताच्या पावलावर पाऊल ठेवत आहे. जगू लिहितो "मला येथे अनेक लोक भेटतात आणि वृद्ध पुरुष व स्त्रिया मला म्हणतात 'तुम्ही काहीपण करा, पण मुलींना भेटू नका.' हे लोक इंग्रजी लोकांना भारतीयांसारखे करत असणार.." (IOR/L/MIL/5/825/5, f.30v, f.31r). जगूचा विश्वास होता की भारतातील नैतिक वर्तनाची पद्धत शिथिल करणे गरजेचे होते कारण त्याच्या मते "ज्या प्रमाणे कु-हाडीचा दांडा ताठ असला तर कु-हाडीचा नाश होतो त्याचप्रमाणे आपल्या ताठर नैतिक पद्धतीमुळे आपला स्व-विनाश (self-destructive) होईल" (IOR/L/MIL/5/825/5, f.30v, f.31r).

**इंग्लंडमधील स्त्री-पुरुष लैंगिक संबंध**

जगू गोडबोलेच्या पत्रांमध्ये नैतिकतेचे विवेचन इंग्लंडमधील स्त्री-पुरुष संबंधाच्या पार्श्वभूमीवर केले आहे. पहिल्या महायुद्धाचा काळ हा इंग्लंडमध्ये सामाजिक संक्रमणाचा काळ होता. ह्या काळात इंग्लंड मधील तरुण स्त्री-पुरुषांमधील लैंगिक संबंधांमध्ये मूलभूत परिवर्तन घडून आले. जगूच्या निरीक्षणातून इंग्रजी स्त्री-पुरुषांमधील खुले लैंगिक संबंध सुटले नाहीत. याबद्दल तो उघडपणे लिहितो :

> येथील बहुतेक पुरुष अविवाहित आहेत. ते पूर्ण दिवस काम करतात आणि संध्याकाळी मुलींबरोबर फिरायला जातात. अनेक पुरुष विवाह करण्याच्या विरुद्ध आहेत. कारण मुलींची संख्या पुरुषांपेक्षा जास्त आहे. जेव्हा जगूने काही तरुणींना विचारले की, त्यांनी लग्न का केले नाही? तर त्या उघडपणे म्हणाल्या "मी कोणाबरोबर लग्न करायचे? तुम्ही जर तयार असाल तर मी पण तयार आहे" (IOR/L/MIL/5/825/8, f.26v, f.27v, f.28v).

इंग्लंडमधील तरुण मोठ्या संख्येने युद्धभूमीवर गेले होते. समाजामध्ये निर्माण झालेल्या तरुणांच्या तुटवड्यामुळे स्त्री-पुरुष लैंगिक संबंधातील संक्रमणाचा व वाढत्या चंगळवादी वृत्तीचा अंदाज जगूने लिहिलेला परिच्छेद वाचल्यावर येतो :

> येथे पुरुषांना स्त्रिया विवाह न करता मिळतात, मग त्यांनी विवाह का करायचा? ह्याची परवानगी देण्यासाठी मुली जबाबदार आहेत; जर त्यांनी हे चालवून घेतले नसते तर, पुरुषांना लग्न करणे भाग पडले असते, पण याबाबतीत मुलींमध्ये हेतूची एकी नाही ... एकदा लग्न झाले की पत्नीच्या नियंत्रणामुळे पुरुषांना इतर मुलींबरोबर संबंध ठेवता येत नाहीत आणि म्हणूनच पुरुष या निष्कर्षापर्यंत पोचतात की, विवाह न करणेच चांगले. खर्च देखील एवढा वाढला आहे की, पुरुष व स्त्रिया विवाह न करणे पसंत करतात. लोक काम करतात आणि मजा करतात, पैसे उडवतात आणि लहान मुलांचा सांभाळ करण्याची ज्यांना काळजी नसते शेवटी वृद्ध वयात सरकारचे पेन्शन मिळते. त्यामुळे त्यांच्या मनात जोपर्यंत चंगळ करता येते तो पर्यंत ती करायची हा विचार प्रबळ असतो (IOR/L/MIL/5/825/8, f.26v, f.27v, f.28v).

जगूच्या पत्रांमध्ये आपल्याला भारतीय सैनिक व इंग्रजी स्त्रिया यांच्यामधील संपर्काबद्दल माहिती मिळते. पहिल्यांदाच माठ्या संख्येने भारतीय वंशाचे सैनिक इंग्लंडमध्ये आले होते. स्थानिक इंग्रजी स्त्रियांशी सैनिकांचा विशेषतः जखमी व आजारी सैनिकांचा संपर्क येणे साहजिकच होते. एके ठिकाणी जगू लिहितो "...जरी द्विविवाहितत्त्व येथे चालत नसले तरी, एका तरुणीने माझ्या एका मित्राला सांगितले की ती त्याची पत्नी होण्यासाठी तयार आहे आणि त्याच्या अन्य भारतीय पत्नीबरोबर कोणताही भांडणतंटा न करता संसार करण्यास तयार आहे" (IOR/L/MIL/5/825/8; f.26v, f.27v, f.28v).

स्वतः जगू इंग्लंडमधील गो-या तरुणीच्या मोहात पडल्याचे संकेत आपल्याला त्याच्या पत्रांमध्ये मिळतात. तो आपले बंधू सीताराम यांना लिहितो :

> मी देखील एखाद्या मुलीच्या प्रेमात पडेन ह्या तुमच्या मनात असलेल्या भीतीला कोणताही आधार नाही असे नाही; पण माझी गरीब परिस्थिती माझ्या मार्गात आडवी येते. ह्या भागातील तरुणी लग्न करण्यासाठी एवढ्या आतुर असतात की मला देखील एक तरुणी भेटली होती. ती म्हणाली "तू

कितीही गरीब असलास तरी हरकत नाही मी तुझ्याबरोबर उघडपणे राहण्यासाठी तयार आहे ... माझे वय जास्त असल्यामुळे आणि मला ऐहिक जीवनाचा अनुभव असल्यामुळे मी कोणाचेही ऐकले नाही" (IOR/L/MIL/5/825/8, f.26v, f.27v, f.28v).

मात्र स्थानिक इंग्रजी लोकांच्या "सैल नैतिकतेचा व स्त्रियांच्या खुल्या किंवा मोकळ्या लैंगिक वर्तनाचा अनुभव घेतल्यावर, जगूने याबाबतचे निष्कर्ष मात्र असाधारण स्वरूपाचे काढले. त्यांने आपले बंधू यांना लिहिले :

आपण त्यांना भौतिकवादी, अनैतिक म्हणतो व स्वतःला धार्मिक, नैतिक व आध्यात्मिक म्हणतो; पण जेव्हा इंग्रज आपल्याला असंस्कृत म्हणतात तेव्हा ते बरोबर असतात; आपले तत्त्वज्ञान, आपल्या धर्माने व आपल्या नैतिकतेने आपल्यासाठी काय केले आहे? त्यांनी आपल्याला इतरांचे गुलाम केले आहे. जेव्हा मनुष्याचे चैतन्य नष्ट होते तेव्हा त्याला सभ्यता म्हणता येत नाही. जेव्हा लोक सुखी, स्वतंत्र आणि चैतन्य असलेले व उच्च उद्दिष्ट प्राप्त करण्याची इच्छा असणारे असतात, तीच प्रगती व नैतिकता असते आणि खरी सभ्यता असते. असत्य तत्त्वज्ञान ऐकणे व आळशीपणाने वर्तमान काळाबद्दल समाधानी राहणे ही सभ्यता नाही. कोणताही बौद्धिक, शारीरिक किंवा आध्यात्मिक आनंद हा निष्क्रियतेमुळे मिळत नाही (IOR/L/MIL/5/825/8; f.26v, f.27v, f.28v).

### प्रकरण घडण्याचे ठिकाण - ब्रायटन येथील किच्नर रुग्णालय

पहिल्या महायुद्धाच्या सुरुवातीला ब्रिटीश प्रशासनाला मोठ्या प्रमाणात जखमी झालेल्या भारतीय सैनिकांना वैद्यकीय सेवा पुरवण्यासाठी ब्रोकेनहर्स्ट, साउथहॅम्पटन, मिलफोर्ड - ऑन - सी, न्यू मिल्टन व बारटन ह्या ठिकाणी रुग्णालये आणि स्वास्थ्यलाभगृहे उपलब्ध होती. मात्र येथील वैद्यकीय सोयी कमी पडू लागल्यामुळे १९१४ सालच्या अखेर ब्रिटनच्या युद्ध कार्यालयाने (war office) काही दक्षिण इंग्रजी शहरांमध्ये भारतीय लष्करी रुग्णालये स्थापन करण्याचा तोडगा काढला.[६] डब्ल्यू. लॉरेन्स हा भारतीय सनदी सेवेमधील अधिकारी पंतप्रधान जॉन मोर्लेच्या कौन्सिलचा सदस्य होता. १९१४ मध्ये त्याला लॉर्ड किच्नर याने कमिशनर नेमले व त्याला फ्रांस व इंग्लंड मधील जखमी व आजारी सैनिकांच्या देखभालीची जबाबदारी दिली. त्याकाळात परिस्थिती गंभीर होती. भारतीय जखमी सैनिकांची देखभाल करण्यासाठी रुग्णालये उपलब्ध नव्हती. याचे प्रमुख कारण हे होते की भारतीय सैनिकांच्या पाणी, अन्न व इतर गरजा त्यांच्या धर्म व जातीप्रमाणे पूर्ण कराव्या लागत असत. डब्ल्यू. लॉरेन्स यांनी इंग्लंड मधील ब्रायटन शहरातील जुन्या इमारती ताब्यात घेऊन भारतीय सैनिकांसाठी तीन रुग्णालये स्थापन केली. ह्या रुग्णालयांमध्ये सैनिकांच्या धर्म व जातींच्या नियमांची काळजी घेण्यात येत असे.[७]

किच्नर हॉस्पीटल हे ब्रायटन मधील सर्वात मोठे रुग्णालय होते. या रुग्णालयात भारतीय वैद्यकीय सेवेतील अधिकारी व सेवक कार्यरत होते. रुग्णालयाचा प्रमुख कर्नल सर ब्रूस सिटन हा होता. सिटन हा भारताच्या व्हाईसरॉयचा मानद सर्जन होता व भारतीय वैद्यकीय सेवेचा डेप्युटी डिरेक्टर होता. प्रमुख रुग्णालयाला लागून असलेल्या एका छोट्या खेड्यात ४०० लोकांची राहण्याची सोय केली होती. उच्च वैद्यकीय अधिकारी वगळता सर्व सेवक ह्याच खेड्यात राहत असत.[८]

किच्नर हॉस्पीटलचा प्रमुख सिटन हा एक कडक प्रशासक होता. त्याने हॉस्पीटल एखाद्या कैदखान्याप्रमाणे चालवलेले होते. जगू रुग्णालयाला "किच्नर हॉस्पिटल जेल" असे संबोधतो. जगूच्या पत्रांमध्ये रुग्णालयातील भारतीय वंशाच्या सैनिकांवर व सेवकांवर लादलेल्या निर्बंधांच्या जाचकते बद्दल कल्पना येते. तो लिहितो की ह्या रुग्णालयात "४६० लोक काम करतात आणि आम्ही 'वॉरंट अधिकारी नसल्यामुळे आम्हाला रात्री साडेआठ वाजेपर्यंत बाहेर राहता येते पण त्यासाठी आम्हाला बाहेर जातांना व आत येतांना दरवाज्याजवळ ठेवलेल्या पुस्तकामध्ये सही करावी लागते. ह्या पुस्तकाकडे एक युरोपियन 'हवालदार' लक्ष ठेवतो आणि दरवाज्यावर एक युरोपियन रक्षक आहे. भिंतीना काटेरी तारेचे रक्षण आहे आणि आम्हाला आत मध्ये कैद्याप्रमाणे ठेवले जाते" (IOR/L/MIL/5/825/8; f.26v, f.27v,

f.28v).

किच्नर रुग्णालयात भारतीय सैनिक व सेवकांवर कडक नजर ठेवली जात असे. काही अपवाद वगळता भारतीयांना ब्रायटन शहरामध्ये नेमलेली व्यक्ती सोबत असल्याशिवाय जाता येत नसे. त्यांना काटेरी तारेने घेरलेल्या रुग्णालयाच्या परिसरातच बंदिस्त ठेवले जात असे. नियम तोडून बाहेर गेल्यास फटके मारण्याची शिक्षा (flogging) दिली जात असे.[१]

रुग्णालयातील भारतीय लोकांवर जाचक निर्बंध निर्माण करण्याचे प्रमुख कारण भारतीयांनी शहरातील स्थानिक स्त्रियांबरोबर मिसळू नये हे होते. सिटनने एका अहवालात असे लिहिले की "शहरामधील स्त्रियांच्या अजाण (innocent) पण गैरधारणेच्या (ill-advised) वर्तनामुळे 'गंभीर भानगडी" (gravest of scandals) होतील" आणि म्हणून रुग्णालयातील सैनिकांना शहरामध्ये जाण्यासाठी कडक नियम निर्माण करणे गरजेचे होते (IOR/L/17/5, pp.6-7).

स्थानिक इंग्रजी लोकांची तथाकथित सैल नैतिकता व स्त्रियांच्या मोकळ्या लैंगिक वर्तनामुळे प्रभावित झालेल्या जगूला किच्नर रुग्लालयातील बंधने जाचक व अपमानकारक वाटणे साहजिकच होते. तो आपल्या पत्रांमध्ये नियमांबद्दल माहिती देतो :

> आम्ही सर्व मिळून २० सहाय्यक शल्यचिकित्सक (Assistant Surgeon) आहोत, उरलेले ४५० रहिवाशी यांना बाहेर पडता येत नाही. खास आदेशानुसार प्रत्येक सहा पुरुषांच्या एका गटाबरोबर एक सहाय्यक शल्यचिकित्सक, शल्यचिकित्सक व एक युरोपियन असतो व ह्या गटांना पाळी-पाळीने एक तास रुग्णालयाच्या बाहेर सोडले जाते. बाकीच्या रहिवाश्यांच्या परिस्थितीची कल्पना करू शकता. त्यांनी रुग्णालयाची इमारत महिनोंमहिने सोडलेली नाही. असे गृहीत धरले की सहा दररोज बाहेर जातील तर सर्वांना बाहेर जायला ७१ दिवस लागतील आणि व्यक्ती अडीच महिन्याने बाहेर पडेल आणि ते ही फक्त एक तासासाठी, ज्या मध्ये त्याला रस्त्यावरील कोणाशी बोलण्याची परवानगी नव्हती (IOR/L/MIL/5/825/8; f.26v, f.27v, f.28v)

जगूच्या पत्रामधुन आपल्याला हे कळते की या सर्व नियमांबद्दल वरिष्ठ अधिका-यांकडे एक तक्रार केली गेली होती आणि त्याची चौकशीदेखील झाली होती, पण वरिष्ठ अधिका-यांकडून असे सांगण्यात आले की रुग्णालयात पुरुषांना लागणा-या सर्व गोष्टी आहेत त्यामध्ये हॉकी, फुटबॉल, फोनोग्राफ, मुफ्त सिनेमा, खेळ इत्यादी गोष्टी होत्या. जगूने पुढे असे लिहिले आहे की ह्या खुलाश्याने फक्त उच्च अधिका-यांचे समाधान झाले.

आपल्या पत्रामध्ये जगू रुग्णालयातील जाचक नियमाचा व 'व्यक्ती स्वातंत्र्याचा' संबंध जोडतो. तो म्हणतो "परमेश्वराने व्यक्तीला त्याला पाहिजे तिथे फिरण्याचा व इतरांबरोबर बोलण्याचा हक्क दिला नाही आहे का?" इंग्लंडमध्ये भारतीय सैनिक साम्राज्याचे रक्षण करण्यासाठी आले होते. त्यातील हजारो जखमी व आजारी सैनिक ब्रायटनमधील रुग्णालयात वैद्यकीय उपचारासाठी आले होते आणि त्यांच्या स्वातंत्र्यावर ब्रिटीशांनी बंधने आणली होती. जगूच्या मते हा ब्रिटीशांचा कृतघ्नपणाच होता." पुढे तो लिहितो "असे असले तरी भारतीय सैनिक याला महत्त्व देत नाहीत आणि आपले काम निमूटपणे करत राहतात. ते कोणताही प्रतिकार करत नाहीत कारण हिंदू सभ्यता अशीच आहे" (IOR/L/MIL/5/825/8; f.26v, f.27v, f.28v).

जगूला ज्या प्रमाणे रुग्णालय तुरुंगासारखे वाटत होते त्याप्रमाणे इतर भारतीयांना सुद्धा वाटत असणार यात शंका नाही. आपल्याला न्यू मिल्टन येथील रुग्णालयाच्या स्टोअरकीपर मीथन लाल याचे २ डिसेंबर १९१५ रोजी लिहिलेले पत्र उपलब्ध आहे. मीथन लाल लिहितो, "हे खरे आहे की आम्ही सुपोषित आहोत, मात्र सर्वात आवश्यक गोष्ट - स्वातंत्र्य - नाकारले जात आहे. भारतामध्ये कैदी अंदमानला पाठवले जातात; पण आम्हाला आमचा कारावास इंग्लंडमध्ये मिळाला आहे" (IOR/L/MIL/5/825/8; f.41r)

**जगू गोडबोलेने केलेला गुन्हा** :

१४ डिसेंबर १९१५ रोजी सीतारामला लिहीलेल्या पत्रात जगूने हे कबूल केले की, त्याने एक गंभीर गुन्हा केला आहे. त्याने याबद्दल लिहिलेला मजकूर असा

आहे :

> इंग्लंडसाठी लाखो हिंदू मृत्यू पत्करत असले तरी त्यांना येथे मोकळेपणाने फिरू दिले जात नाही. ही कृतघ्नता (ungratefulness) मला सहन झाली नाही. एके दिवशी मी पिस्तूल घेतले आणि कर्नलला मारण्यासाठी गेलो पण मला पकडले गेले आणि मागील महिन्यात मला तुरुंगात ठेवण्यात आले. उद्या ह्या बाबीचा निकाल लागेल आणि काय निकाल लागला हा मी तुम्हाला कळवीन. जर मला सोडले तर चांगलेच आहे; जर सोडले नाही तर मी संन्यासी जीवन जगेन (IOR/L/MIL/5/826/1; f.23r, f.23v, f.24r, f.24v)

जगूने किच्नर रुग्णालयाचा प्रमुख कर्नल ब्रूस सिटनला कोणत्या दिवशी मारण्याचा प्रयत्न केला, ही माहिती पत्रांमध्ये उपलब्ध नाही. मात्र नहार सिंग ह्या हिंदू जाट शिपायांनी लिहिलेल्या पत्रामध्ये आपल्याला जगू गोडबोलेने केलेल्या गुन्ह्याबद्दल थोडी माहिती मिळते. २७ नोव्हेंबर १९१५ रोजी नहार सिंग लिहितो, "मी अजून इथेच आहे कारण मी एका लष्करी खटल्याशी संबंधित झालो आहे. माझ्या हॉस्पिटलच्या सर्जनला (जो सध्या कर्नल आहे पण ज्याला लवकरच जनरल होण्याची आशा आहे) एका सब-असिस्टंट सर्जनने रिव्हॉल्वर वापरून धोक्यात आणले. परमेश्वराच्या कृपेने रिव्हॉल्वर अपप्रज्वलित (misfire) झाली आणि मी त्या माणसाला लगेचच पकडले" (IOR/L/MIL/5/825/8; f.33r). जगूने १६ नोव्हेंबर रोजी लिहिलेल्या पत्रात याबद्दल कोणताही उल्लेख किंवा गुन्हा केल्याचे नैराश्य आढळत नाही. यामुळे आपण असे म्हणू शकतो की, १६ नोव्हेंबर ते २७ नोव्हेंबर १९१५ या दिवसांमध्ये जगूने कर्नल सिटनवर हल्ला केला होता.

**शिक्षा :**

जगू गोडबोलेला अटक झाल्यावर मात्र त्याच्या पत्रांमधून नैराश्याचा सूर येण्यास सुरुवात होते. आपल्या कृत्यामुळे बंधू सीतारामला त्रास होणार आहे याची त्याला पूर्ण कल्पना होती. एका पत्रात तो लिहितो, "माझ्या तुरुंगवासामुळे तुम्हाला दुःख होईल व तुमच्यावर जास्तीचा खर्च पडेल म्हणून मला वाईट वाटते. नाहीतर मला दुःख वाटत नाही." जगुला ही कल्पना होती की युद्ध काळात त्याने एक गंभीर स्वरूपाचा अपराध केला होता. त्याला हे देखील माहिती होते की कोर्ट मार्शल मध्ये ठोठावलेल्या शिक्षेच्या विरोधात अपील करता येत नसे. मात्र त्याला आशा होती की, युद्ध संपल्यावर त्याची शिक्षा कमी केली जाईल. तुरुंगात त्याला मिळालेल्या वागणुकीची माहिती जगूने एका पत्रात दिली आहे. तो म्हणतो, "मला तुरुंगात एका पाठोपाठ एक अधिका-यांनी भेट दिली, प्रत्येक अधिका-याने वेगवेगळे प्रश्न विचारले, ज्यामुळे मला थकवा आला. मी त्यांना घालवण्यासाठी तोंडात येतील ती उत्तरे दिली; पण काही जण मला चिडवण्यासाठी आले, आपण किती हुशार आहोत हे दाखवण्यासाठी आले. एक जण आला आणि माझ्या हातात कड्या घातल्या, दुसरा आला आणि लाईट सुरू केले व तोंडातली सिगरेट पेटवून माझ्या हात कड्या काढायला सांगितल्या; पण सार्जंटने लेखी आदेश दाखवल्यावर त्यांनी मला एकटे सोडले. तिस-याने माझ्या अवतीभोवती कागद पडलेले पाहिले आणि त्याला ते मी वाचून दाखवावे असे वाटत होते." ह्या मजकुरानंतर पत्र परिनिरीक्षकाने एक टिप लिहिलेली आहे की अशा प्रकारचे छोटे अनेक तपशील गोडबोलेने लिहिले आहेत. मात्र ह्या तपशिलांचे भाषांतर परीनिरीक्षकाने वगळले असल्यामुळे आपल्याला ते उपलब्ध झालेले नाहीत (IOR/L/MIL/5/825/8; F.26v, F.27v,F.28v).

एका पत्रामध्ये जगूने त्याला तुरुंगात चांगली वागणूक दिली जात होती असा उल्लेख केला आहे. जगू लिहितो : "ज्याप्रमाणे आई आपल्या मुलाकडे लक्ष देते त्याप्रमाणे माझी काळजी घेतली जाते. उदाहरणार्थ, मला रोज अंघोळ करता येते व मला कपडे धुण्याची परवानगी आहे म्हणून मला स्वच्छ कपडे मागण्याची गरज भासत नाही. मात्र दात घासण्यासाठी ब्रश व दाढी करण्यासाठी सामान दिले जात नाही व मला ते मागणे देखील उचित वाटत नाही" (IOR/L/MIL/5/825/8; f.26v, f.27v, f.28v).

१८ डिसेंबर १९१५ च्या पत्रात तो लिहीतो "काल मला माझी 'भगवत्गीतेची प्रत मिळाली यामुळे माझा वेळ निघून जातो, यासाठी मी कृतज्ञ आहे. मी अजून

बंदिवासात आहे. जरी मी एक गंभीर गुन्हा केला असला तरी, अधिकारी मला दयेने वागवतात. मी परमेश्वराच्या प्रती कृतज्ञ आहे आणि (खटल्याच्या) शेवटाची वाट शांतपणे पहात आहे" (IOR/L/MIL/5/826/1; f.23r, f.23v, f.24r, f.24v).

खटल्याचा निकालात जगूला ७ वर्षे सक्त मजुरीची शिक्षा ठोठावण्यात आली. शिक्षा कळण्याच्या आधीच जगूने सीतारामला हे कळवले होते की, "शिक्षा काहीही असो, हे स्पष्ट आहे की मी तुम्हाला अनेक वर्षे भेटू शकणार नाही, कदाचित मी तुम्हाला कधीच भेटू शकणार नाही कारण हा युद्ध काळ आहे आणि शिक्षा कडक आहेत. काहीही असले तरी मी परमेश्वरावर विश्वास ठेवतो आणि निमूटपणे सहन करतो. सुखी राहा आणि माझी चिंता करू नका. आजपर्यंत मी एक ब्रह्मचारी होतो आणि येथून पुढे देखील ब्रह्मचारी राहणार आहे. तुम्हाला नाना बागुल यांचा पुत्र बापू बागूल संन्यासी जीवन जगतो यावर आक्षेप आहे का?" मला नाही वाटत, मग माझ्याबद्दल तुम्हाला का वाईट वाटावे?" (IOR/L/MIL/5/826/1; f.23r, f.23v, f.24r, f.24v).

जगूला आपण केलेल्या गुन्ह्याबद्दल खंत होती हे त्याच्या १९ डिसेंबर १९१५ च्या पत्रावरून दिसते. जगू लिहीतो, "आज मला माझी शिक्षा कळली. मला सात वर्षे सक्त मजुरीची शिक्षा झाली आहे. मला जे काय घडले त्याबद्दल वाईट वाटते पण त्याचा आता फायदा नाही. जे काही होईल ते सोसावे लागणार. हा विचार करून मी जिवंत राहीन. माझी काळजी करू नका. मी सर्वांना नमस्कार करतो." ह्या पत्राचे शेवटचे वाक्य अतिशय उद्‌बोधक आहे. जगूने शेवटी असे लिहिले आहे की, "क्रोधामुळे जाणीव जाते ज्याच्यामुळे चुका होतात. मन जेव्हा वेंधळे होते तेव्हा विचार जातो आणि जेव्हा विचार जातो तेव्हा संपूर्ण विध्वंस (total destruction) होतो" (IOR/L/MIL/5/826/1; f.23r, f.23v, f.24r, f.24v).

**समारोप** :

पहिल्या महायुद्धाच्या काळात भारतीय सैनिक स्थानिक स्त्रियांच्या सहवासात आले. भारतामध्ये अशा प्रकारचा संपर्क शक्य नव्हता. इंग्लंड मध्ये एक प्रकारचा 'खाकी ज्वर (khaki fever) निर्माण झालेला होता. अधिकारी वर्ग, स्त्रीवादी विचारवंत व समाजसुधारक यांनी ही भूमिका घेतली की, वसाहतींमधील सैनिकांच्या सहवासात आल्यामुळे मजूर वर्गातील इंग्रजी स्त्रियांची लैंगिकता बदलू लागली होती. इंग्लंडच्या वेगवेगळ्या वसाहतीतून आलेल्या वेगवेगळया वंशाच्या सैनिकांच्या-बरोबर सामान्य कुटुंबातील इंग्रजी स्त्रियांचे लैंगिक संबंध येण्याचा धोका निर्माण झाला होता. ब्रिटीश सैनिकी अधिका-यांना ब्रिटीशांचे वांशिक श्रेष्ठत्व शाबूत ठेवणे गरजेचे होते. इंग्लंडमध्ये तरुण स्त्रियांचे लैंगिक वर्तन नियंत्रित करण्यासाठी एक चळवळ सुरू झाली.[१०] यामुळेच ब्रिटीश अधिका-यांनी ब्रिगटनमधील रुग्णालयांमध्ये भारतीय सैनिकांवर जाचक निर्बंध घातले होते.

एक गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे की, ब्रायटनमधील भारतीय सैनिक व स्थानिक स्त्रिया यांच्यामधील लैंगिक संबंधांची चिंता ही ब्रिटीश अधिकारी वर्गालाच होती. स्थानिक लोकांना याबद्दल काळजी नव्हती. उलट स्थानिक वृत्तपत्रांमधून पूर्वेकडील देशातून आलेल्या लढाऊ जातींच्या लोकांबद्दल कुतूहल व उत्सुकता होती. भारतीय सैनिकांचे आगत-स्वागत करण्यासाठी होव (Hove) ह्या ठिकाणी ब्रिगटनच्या लोकांनी एक गार्डन पार्टी दिली होती, हिंदू व मुस्लिम सैनिकांसाठी दोन वेगवेगळे कत्तलखाने निर्माण केले होते. ब्रायटनमधील लोक व भारतीय सैनिक यांच्यामधील संपर्काच्या भावनात्मक गोष्टी स्थानिक वृत्तपत्रांमध्ये वारंवार छापल्या जात होत्या. ब्रायटन हॅरल्ड या वृत्तपत्रात एका भारतीय सैनिकाने एका गो-या लहान मुलाला उत्स्फुर्तपणे उचलल्यावर कशा प्रकारे इतर मातांनी आपली लहान मुले सैनिकांच्या हातात द्यायला सुरुवात केली याची खबर दिली होती.[११]

मात्र ब्रायटनच्या लोकांमध्ये भारतीय सैनिकांबद्दल असलेले कुतूहल व उत्सुकता सरकारी अधिकारी वर्गामध्ये नव्हती. त्यांचे लक्ष साम्राज्याचे वांशिक श्रेष्ठत्व व भारतीय सैनिक व स्थानिक स्त्रिया यांचा सहवास नियंत्रित करण्याकडे होते. इतिहासकार ॲन स्टोलर यांनी दाखवल्याप्रमाणे ब्रिटीश वासाहतिक सत्ता अगदी सूक्ष्म

पातळीवर वांशिक व लैंगिक संबंध नियंत्रित करत होती.[१२]

जगू गोडबोले हा महाराष्ट्रातील ब्राह्मण जातीतील मध्यम वर्गीय कुटुंबाचा सदस्य होता. इंग्लंडमधील सामान्य लोकांनी त्याला दिलेली चांगली वागणूक, स्त्री-पुरुषांची ढिली नैतिकता, खुले लैंगिक संबंध व स्थानिक स्त्रियांच्या मोकळ्या वागणुकीचा त्यांच्या विचारांवर प्रभाव पडणे स्वाभाविक होते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला महाराष्ट्रातील मध्यम वर्गातील विशेषतः ब्राह्मण जातीतील तरुण-तरुणींच्या संबंधांवर कडक निर्बंध होते. महाराष्ट्रात त्या काळात प्रेमाची संकल्पना ही 'अशारीरिक' (Platonic) स्वरूपाची होती. तरुण-तरुणींमधील शारीरिक आकर्षणापेक्षा 'अशारीरिक प्रेम' असले पाहिजे ह्या विचारांचा तरुण मनावर खोल प्रभाव होता. अशारीरिक प्रेमाच्या संकल्पनेला सर्वव्यापी व रूढ सामाजिक प्रकृतिधर्माने पुष्टी दिली होती. ह्यामुळे सार्वजनिक ठिकाणी स्त्री-पुरुषाच्या कोणत्याही शारीरिक संपर्काला अथवा स्पर्शाला परवानगी नव्हती. तरुण-तरुणींनी एकमेकाचे हात पकडणे देखील निषिद्ध होते.[१३] त्या काळातील मध्यम-वर्गामध्ये हा विचार रूढ होता की फक्त पुरुषांमध्येच 'रम्य प्रेम' (romantic love) व लैंगिक इच्छा जागृत होतात, स्त्रियांना फक्त आपल्या मुलांवर प्रेम करण्याचेच सामर्थ्य असते. स्त्रीला भावना व लैंगिक वासना नसते अशा प्रकारचा समज विसाव्या शतकाच्या सुरुवातीला महाराष्ट्रात रूढ होता.[१४]

इंग्लंड मधील आपल्या अनुभवांमुळे तरुण-तरुणींचे नैसर्गिक आवेश व भावना दडपून टाकणा-या ह्या नैतिक भूमिकेबद्दल जगूला तिरस्कार निर्माण झाल्याचे आढळते. इंग्रजी स्थानिक स्त्रियांचा मोकळा सहवास मिळाल्यामुळे त्याचा स्वाभिमान जागृत झाला. भारतामधील ब्रिटीश शासनाने निर्माण केलेल्या 'वांशिक श्रेष्ठत्वाला' तडा गेला. रुग्णालयाच्या उच्च अधिका-यांनी भारतीय सैनिकांच्या स्थानिक शहरामध्ये मुक्त संचार करण्यावर निर्बंध आणल्याचे जगूला सहन झाले नाही. ब्रिटीश साम्राज्याच्या रक्षणसाठी आलेल्या भारतीय सैनिकांना ब्रिटीश अधिका-यांनी दिलेली कृतघ्न वागणूक पाहून तो संतापला. संतापाच्या भरात त्याने किच्नर रुग्णालयाच्या प्रमुखाला गोळी घालून ठार मारण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा हा प्रयत्न फसला.

जगू गोडबोले प्रकरण घडण्यामागे प्रमुख कारण हे ब्रिटीश सत्तेने भारतामध्ये कार्यान्वित केलेला 'वासाहतीक फरकाचा नियम' (rule of colonial difference) होता. ब्रिटीश सत्ता ही पूर्वीच्या साम्राज्यवादी किंवा समकालीन युरोपियन सत्तांपेक्षा वेगळी होती. ह्या सत्तांनी आपल्या अधिपत्त्याखाली आलेल्या प्रदेशातील अभिजन वर्गावर लक्ष केंद्रित करून त्यांचे सांस्कृतिक व राजकीय समावेशनसात्मीकरण (assimilation) करण्याचे प्रयत्न केले होते. त्यांनी सत्ताधीश लोकांमधील आणि अंकित लोकांमधील फरक कमी करण्याचा प्रयास केला होता. ब्रिटीश सत्ता मात्र वेगळी होती. त्यांनी आपले लक्ष अंकित प्रदेशामधल्या अभिजन वर्गाच्या बरोबर सामान्य लोकांवर ही केंद्रित केले. त्यांनी आपल्या व वसाहती लोकांमधील फरक नुसता स्वीकारला नाही तर त्याला आकार देखील दिला.[१५] ब्रिटीशांनी राबवलेल्या वासाहतीक फरकाच्या नियमांमध्ये वंशश्रेष्ठत्त्वाच्या संकल्पनेची महत्त्वाची भूमिका होती. इंग्रजी पुरुषांप्रमाणे इंग्रजी स्त्रिया देखील श्रेष्ठ होत्या हे त्यांना भारतीय लोकांच्या मनावर बिंबवणे गरजेचे होते. वसाहतवादी विचारप्रणालीमध्ये इंग्रजी स्त्री ही 'सात्त्विक, पतिव्रता, विनयशील व धीरगंभीर (demure)' असून ती नीच वासाहतिक स्त्री-पुरुषांपेक्षा अनेक पटीने श्रेष्ठ होती. थोडक्यात इंग्रजी स्त्री ही इंग्लंडच्या नैतिक श्रेष्ठत्वाचे प्रतिनिधीत्व करणारी होती.[१६]

ब्रिटीश सत्ताधीशांनी वासाहतिक फरकाचा नियम भारतीय लोकांच्या मनावर बिंबवला होता व त्यांच्यावर वैचारिक प्रभुत्व (hegemony) निर्माण केले होते. वसाहतवादाची ही विचारप्रणाली भारतीय लोकांनी स्वीकारल्यामुळेच ब्रिटीशांचे राज्य इतके दीर्घकाळ चालले. मात्र असे असले तरी त्यांना ही नेहमी भीती वाटत होती की, कोणत्यातरी कारणामुळे भारतीय लोक ह्या विचार-प्रणालीचा अस्वीकार करतील व ब्रिटीश राज्यकर्त्यांना सांस्कृतिक व नैतिकदृष्ट्या दुय्यम मानायला लागतील.[१७] या कारणामुळेच ब्रिटीश अधिका-यांनी रुग्णालयातील भारतीय सैनिकांच्या हालचालींवर निर्बंध आणले होते. जगू गोडबोले इंग्लंडमधील सामान्य प्रजेच्या चांगल्या व समान वागणुकीमुळे प्रभावित झाला. ब्रिटीश सत्ताधीशांच्या



अनुक्रमणिका

कृतघ्नपणामुळे त्याच्यात नैतिक आक्रोश निर्माण झाला. इंग्रजी श्रेष्ठत्त्वाच्या विचाराचे प्रभुत्व झिजल्यामुळे त्याने सर्व सैनिकांवर होणा-या अन्यायाचा प्रतिकार केला.

जगू गोडबोले प्रकरण, जे एका अर्थाने क्षुल्लक होते, पण ते आपल्याला पहिल्या महायुद्धाच्या काळात इंग्लंडला गेलेल्या भारतीय लोकांच्या भावना, प्रश्न व विचारांमध्ये डोकावण्याची संधी देते. नैतिकता, लैंगिकता व वंशभेद यांचा संबंध असलेले हे प्रकरण आपल्याला इंग्लंडमधील भारतीय सैनिकांची परिस्थिती आणि त्यांची मानसिकता व ब्रिटीश अधिका-यांनी त्याच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी केलेले प्रयत्न याबद्दल खूप काही सांगून जाते.

**संदर्भ** :

1) Wilcocks, James, with the Indians in France, constable and Company Ltd., London, 1920.

2) Omissi David (editor), Indian Voices of the Great War, Soldiers' Letters, 1914-18, Penguin, 2014, p.1; Singh, Gajendra. The testimonies of Indian Soldiers and the Two World Wars: Between Self and Sepoy, A & C Black, 2014.

3) Carlo Ginzburg, John and Anne Tedeschi (trans.), The Cheese and the Worms: The Cosmos of a sixteenth-Century Miller, The Johns Hopkins University Press, Baltimore, 1980; Natalie Zemon Davis, The Return of Martin Guerre, Harvard University Press, Cambridge, 1983; Robert Darnton, The Great Cat Massacre and other Episodes in French Cultural History, Basic Books, 1999.

4) Carlo Ginzburg, John and Anne Tedeschi (trans.), The Cheese and the Worms: The Cosmos of a Sixteenth-Century Miller, The Johns Hopkins University Press, Baltimore, 1980, p.xxi.

5) प्रस्तुत शोध निबंधात संदर्भ दिलेली इंडिया ऑफिस रेकॉर्ड (IOR) मधील सर्व पत्रे व अहवाल ब्रिटीश लायब्ररीच्या वेबसाईट किंवा http://www.europeana.eu या इंटरनेट पत्त्यावर डिजीटल स्वरूपात पाहण्यासाठी उपलब्ध आहेत. f. 122r हे संकेतस्थळावरील पृष्ठ क्रमांक दर्शवते.

6) Samuel Hyson and Alan Lester, "British India on Trial: Brighton Military Hospirals and the politics of Empire in World War I, Journal of Historiacal Geography, 38 (2012), p. 18.

7) W. Lawerence, The India We Served, Classell and Company ltd, London, 1925, pp. 269-270.

8) The Kitchener Indian Hospital, Brigton, The British Medical Journal, April 3, 1915.

9) Omissi, D. 'Europe Through Indian Soldiers Encounter England and France, 1914-1918', The English Historical Review, CXXII, no. 496 (1 April 2007), p. 380.

10) A. Wollacott, 'Khaki Fever' and its control : gender, class, age and sexual morality on the British homefront in the First World War, Journal of Contemporary History, 29, 1994.

11) S. Hyson, A. Lester, Journal of Historical Geography, 38, (2012), p. 27.

12) Ann Laurga Stoler, Carnal Knowledge and Imperial Power : Gender, Race and Morality in Colonical Asia, in Joan Wallach Scott (ed.), Feminism & History, Oxford University Press, 1996, pp. 209 - 266.

13) Meera Kosambi, Women writing Gender : Marathi Fiction Before Independence, Permanent Black, 2012, p. 53.

14) शिरुरकर विभावरी, पंचेचाळीस वर्षांपूर्वीच्या गोष्टी, कळ्यांचा निःश्वास, पॉप्युलर प्रकाशन, दुसरी आवृत्ती,

अनुक्रमणिका








मुंबई, १९८६, पृ. v-xxx.

15) Mahmood Mamdani, Define and Rule : Native as Political Indentity, Harvard University Press, London, 201, Introduction (unpaginated).

16) Thomas R. Metcalf, Ideologies of the Raj, Cambridge University Press, 1995, pp. 107-108.

17) Ashish Nandy, The Intimate Enemy : Loss and Recovery of Self under Colonialism, OUP, Delhi, 1983 , pp. 10-11.



**पुस्तक परीक्षण :**

# 'दुरून कुठून तरी' - आत्मप्रत्ययाची कविता

पंडितराव पवार

'कवितेचं व्यसन । कवितेची झिंग । मनातल्या खेळांचे । तीच फोडते बिंग' - या साध्या सोप्या कवितेच्या ओळी कवी दिलीप पाटील यांच्या 'दुरून कुठून तरी' - या अलीकडच्या कविता संग्रहातील आहेत. या काव्य पंक्तीतून कवीची काव्यावरील अचल निष्ठा आणि आत्मप्रत्ययाचा अनुभव सूचित होतो. कवीचा हा अनुभव आत्मनिष्ठा, व्यक्ती आणि समाज जीवनातील आंतरिक नाते, मानवी नात्यांचे स्नेहशील भावबंध, निसर्गाची विलसिते, त्याचा -हास, आजच्या व्यवस्थेतून जाणवणारा मूल्य-हास आणि आशावाद-अशा बहुआलापी स्वरूपात या संग्रहात आपणास पानोपानी जाणवतो. याचे कारण कवीचे जीवनावरील प्रेम आणि डोळस निरीक्षण होय. या संग्रहातील कवितांत समाजातील मूल्य-हासांचे चित्रण हा कवी अत्यंत संयमाने अणि प्रामाणिकपणे, सहानुभूतीने करतो. त्यामुळे कविता वाचकांच्या अंतःकरणाला भिडते, त्याला अंतर्मुख करावयास लावते. 'कोंडी' या विविध पुरस्कारप्राप्त कवितासंग्रहानंतरचा या कवीचा हा दुसरा कवितासंग्रह होय.

**कवीची आत्मनिष्ठा -**

कवी आपल्या जीवनाचे ओझे वाहताना पलायनवादी नाही. 'झाल्या तरी जखमा बहु पण मी थांबणार नाही' - ही कवीची जीवननिष्ठा चिरंतन आहे. नशिबी आलेले 'दुःख कितीही टाळण्याचा प्रयत्न केला, तरी 'ओझं उरी घ्यावं लागलं' - हा कवीचा आत्मप्रत्यय आहे. येथे क्षणोक्षणी 'विवश' होऊन चालत नाही. जीवनात आलेले क्षण अचूकवेळी टिपावे लागतात. वेळ निघून गेल्यावर - आपण घड्याळाच्या काट्याची कळ 'उलटी फिरवू शकत नाही' याचे डोळस भान या कवीने आपल्या अनुभवसंपन्न जीवनातून मिळविले आहे. आपल्या आईचा जन्म म्हणजे न आटणारा पाझर - हे विश्वसत्य कवी सहजपणे व्यक्त करतो. अशी आई जन्मभर 'प्रत्येक उच्छवास टाकायची देवाचं नाव घेऊन'- पण अखेरीस देवाने तिला असाध्य आजारात हात दिला नाही - म्हणून तिने देवालाच झिडकारले, हा अशिक्षित पण शहाण्याबाईंचा अनुभव कवी कारुण्यपूर्ण शब्दात साकारतो. अनोळखी जीवांना आयुष्याचा सोबती बनविण्याची स्नेहशीलता आणि एखाद्या क्षणी वियोगानेही रोजचा उत्साह हा कवी आत्मप्रत्ययामुळे गमावून बसतो. 'उभ्याजन्मात' कधी हा कवी आनंदी होऊन 'गर्दीत नाचलो-वेड्यापरी' असा स्वान्तसुखाचा अनुभव घेतो, तर कधी जीवनातील विसंगती 'जागोजागी झाली - स्वप्नांची निराशा' - अशी प्रकटते. पण या जीवन संघर्षात वावरताना कवीला -

'आपलं जीवन असतं । फक्त काट्याकुट्याचं
भाकरीसाठी रात्रंदिवस झटण्याचं । वर्षानुवर्षे' -

या प्रखर वास्तवाचे डोळस भान आहे. त्यामुळेच सभोवतालचा विषमतेचा काळोख पाहून हा कवी आकाशातील कोप-यात 'मंदमंद लुकलुकणारा तेजस्वी तारा पाहून' उभारी घेतो. 'नको होऊ दुःखी । नको ठेऊ ध्येय। माझं ऐक मित्रा । काळजावर दगड ठेव' - ही आपल्या मनाला घातलेली समजूत कवीची प्रखर आत्मनिष्ठा आणि जीवननिष्ठा आहे. गावची नदी पाहून कवी मन भूतकाळातील वैभवाच्या आठवणीत रमतानाच वर्तमानाचे – तीव्रदाहक स्वरूप त्याचे मन व्यथित करते. ही स्वामित्वनिर्देशक आत्मनिष्ठा आणि पत्नीतच मीरा-राधा पाहणारा हा आत्मनिष्ठ कवी आपल्या जीवन-निष्ठांशी प्रामाणिक आहे. यात शब्दफुलोरा नाही भवताल आणि कुटूंबाशी जोडलेली अस्सल नाती आत्मप्रत्ययातून सहजपणे व्यक्त होतात. कवीची ही स्वनिष्ठा आणि जीवनाशी तडजोड ही या कवितेची वैशिष्ट्ये म्हटली पाहिजेत.

'विस्कटले आहे आवर, मन सांगत आले
बिघडते आहे, सावर, मन सांगत आले' (पृ.









६९) - कवीचे भवताल आणि अंतर्मन यांच्या संघर्षातून प्रकटलेली तडजोड, समजूतदारपण केवळ कवीला याचा आधार देत नाही, तर अनेक विस्कटलेल्या मनांना सावरण्याचे बळ देतो. याचे कारण कवीची सच्ची आत्मनिष्ठा होय. त्यात कोणताही बेगडी देखावा नाही.

**समाजजीवनातील विसंगतीचे उत्कट दर्शन -**

कवी ही जीवननिष्ठा आपल्या आत्मप्रत्ययातून सहजपणे व्यक्त करतो. त्याचप्रमाणे समाजाकडे डोळस दृष्टीने पाहून त्यातील विसंगतीनारी अत्यंत संयमाने आपल्या कवितेत शब्दबद्ध करतो.

'आणि माझी कोरडी कहाणी। ऐकण्याआधीच आपलं रडगाणं सुरू केलंस ही सुद्धा माझी दिशाभूलच नाही का?' (पृ. १७)

या ओळीतील दुष्काळग्रस्त माणसाला जाणवलेला नात्यातील तुटलेपणा आणि स्वार्थ - स्पष्ट होतो.

आजचे व्यक्तीचे दैनंदिन जीवन सामाजिक, राजकीय दहशतीखाली दबून गेले आहे. सकाळी कामावर गेलेला माणूस सायंकाळी - स्फोटकांच्या जाळयातून सुखरूप परत येण्याची शाश्वती राहिली नाही. पण तो सुखरूप घरी पोचला, तर ते त्या कुटुंबाचे सुदैव होय.

'आणि अजगरासारखी लांबत गेलेली। पुढा-यांची भाषणे संपल्यावर एकामागोमाग निघत चाललेल्या। रंगिबेरंगी अलिशान गाड्यांनी डोळयात फेकलेल्या धुळीकडे पाहून। तेथे जमलेल्या गर्दीवर त्वेषाने थुंकित तो। खदाखदा हासत सुटला' (पृ. ३०)

आजचे सत्तालोचट राजकारणी सामान्य माणसांना 'वेडा' बनवून दर पाच वर्षांनी त्याच्या डोळयांत आश्वासनांची धूळ फेकतात. पण सामान्य माणूस आता ही स्वार्थी वृत्ती चांगलीच ओळखून आहे, हेच कवीला सुचवायचे आहे. या स्वार्थी राजकारण्यांनी समाज घुर्शीसारखा पोखरून टाकला आहे. म्हणून कवी त्वेषाने म्हणतो,

'आता मात्र हे घर। नव्याने उभारू शकणारा - - - क्रांतिकारक जन्माला । घातलाच पाहिजे.' (पृ. ३९) कवीची ही क्रांतीची भाषा रास्तच आहे.

शेतक-यांचे जीवन म्हणजे निसर्गाचा जुगार-कधी अवकाळी पाऊस, कधी-दुष्काळ, तर कधी-टोळधाडी यात शेतकरी बर्बाद होतो. तर कधी-मंदी, तर कधी व्यापा-यांनी केलेली लुट ही-सुलतानी लूट असंघटित शेतकरी उघड्या डोळयांनी असहाय्यपणे पाहतो. ही टोळधाड आता उद्ध्वस्त केली पाहिजे, असे कवीस वाटते. म्हणून तो म्हणतो,

'भल्या-भल्याने एकत्र येऊन। बहरलेल्या शेतांचा नाश करण्यासाठी सर्वत्र संचार करणा-या। या हिंस्र टोळ्यांचा नायनाट आपणही एकजुटीने करू शकतो। हे माझ्या शेजा-यांच्या ध्यानातच येत नाही' (पृ. ४६) या काव्यपंक्तीतील शेतक-यांच्या दुहीचे स्पष्ट चित्र कवी रेखाटतो -

आजच्या प्रगत समाजात स्त्री अजूनही भोगवस्तू आणि अन्यायग्रस्त आहे. हे सूचित करताना कवी लिहितो,

'त्याने तिला जाळून मारले। ही बातमी आता जायला हवी, अत्याचारी पतीला धडा शिकविला। ही नवी बातमी आता यायला हवी, ही स्त्रीला तिची अस्मिता जागी करणारी कवीची भूमिका नव्यायुगाला सजग करणारी आहे.'

आज समाजात सर्वच क्षेत्रात मूल्य-हास होत आहे. कवीला हे चित्र पाहताना संत तुकोबांचे बोल आठवतात आणि अत्यंत उपहासाने कवी म्हणतो,

'अंधश्रद्धेवरी। तुम्ही केले वार। बुवांनी बाजार। मांडियला, कवी म्हणे आता। रात्रंदिन युद्ध। कुठे शोधू बुद्ध। ऐशा जगी?' (पृ. ५६)

गरीबांना छळणे, वृक्षतोड, सहकारातील स्वाहाकार अशी केली तरी मूल्य-हासांची दृष्ये कवीला अस्वस्थ करतात.

समाजातील भ्रष्टाचार आणि काळी कृत्ये नष्ट करण्यासाठी कीड लागलेली व्यवस्था जाळण्यासाठी, गरीब - श्रीमंतांमधील दरी मिटवण्यासाठी, धर्मांधतेचा वणवा विझविण्यासाठी कवी 'नवीन युगाच्या' सूर्याला आवाहन करताना म्हणतो,

'हे नवीन युगाच्या सूर्या!। शिकण्या-जगण्याचा समान हक्क, सर्व माणसांना मिळू दे। अन् सामाजिक न्यायाचा खरा अर्थ, सगळ्या कारभा-यांना कळू दे' (पृ. ५९) यातून कवीला भारतीय संस्कृतीच्या मूल्यांचा -हास, शेतक-यांच्या आत्महत्या, तरुणांची व्यसनाधीनता, गुटखा,

दारू, मटका या सर्वच गुणदोषांचे वास्तव चित्र स्पष्ट केले आहे. कुंपणानेच शेत खाण्याची प्रवृत्ती नष्ट झाल्याशिवाय समाजात समानता आणि मानवता रूजणे शक्य नाही ही कवीची प्रामाणिक धारणा वाचकास अंतर्मुख करणारी आहे. ही 'नांदी' कवी तळमळीतून व्यक्त करतो.

**निसर्गप्रेम आणि पर्यावरण -हासांचे दर्शन**

कवीचे निसर्गप्रेम आणि पर्यावरणरक्षणाची भावना हेही या कवितांचे एक वैशिष्ट्य आहे. 'आला-श्रावण-श्रावण' मधील 'भुई नवरी नटली शालू हिरवा नेसून' - हे चित्र मनोवेधक आहे. चंद्र-पक्षी युगानुयुगे सोबत शोधूनही एकलेपणाचे दुःख भोगतो. ही कारुण्याची किनार कवी सहजपणे साकारतो या कवितेत चंद्र आणि गुरूपत्नीचे मिथक प्रतीकमान अर्थाने खुणवून जाते.

झाडांची वेगाने होणारी 'पानगळ' आणि बदलत्या काळाचा अनोखा संबंध कवी आपल्या निसर्गभानातून आणि बदलत्या जगाकडे पाहण्याच्या डोळस दृष्टीतून व्यक्त करतो. बेडकांच्या डबक्यातील तात्कालीक ओरडण्याचा अन्वय कवी माणसाच्या संकलित - अशा कुपमंडुक वृत्तीशी जोडू पाहतो. बेडकांना गायीच्या डोळ्यातील करुणा, सिंहाची गर्जना, कोकीळ कुंजन, हत्तीची डौलदार चाल आणि कासवाची पाठीवरची पोलादी ढाल पाहण्याची दृष्टी-त्यांच्या डबक्यातील संकुचित वृत्तीमुळे-संपुष्टात आलेली असते हेच खरे.

आज घनदाट जंगलांची जागा 'भयारण्या'ने घेतल्याचे शल्य कवीला बोचते. चिमण्या-पोपट यांची जागा घुबड-कावळे यांनी घेतली. कारण येथील आंबा-पिंपळाच्या जागी बोरी-बाभळींनी गर्दी केली. स्वार्थीवृत्तीतून 'एकेकाळी नावाजलेलं हे अभयारण्य-भयारण्य कसं झालं? कुणी केलं?' - हे प्रश्न कवीला अस्वस्थ करतात. 'प्राण वायूसाठी प्रत्येकाला राहील का हिरवीगार फांदी?' ही विनाशाची 'नांदी' कवी असहाय्यपणे सूचित करतो. एकंदरीतच सामाजिक आणि निसर्गविषयक पर्यावरण -हास याविषयी कवीची समाजहिताची दृष्टी कवितेतून जाणवते. माणसाला झाला माणूस पारखा ही मूल्य-हासांची जाणीव कवीला व्यथित करते. निसर्गातील उदात्तता हीच माणसाला वाचविणारी शक्ती आहे. हे कवी 'झाडे' कवितेतून तितक्याच उदात्त शब्दात सांगतो. तुकोबांनी झाडांना 'सोयरे' का म्हटले हेही लक्षात घेणे महत्त्वाचे आहे.

'झाडे निःस्वार्थपणे सर्वकाही देत राहतात दुस-यांना
कारण - - - झाडांना लोभही नसतो।आपल्या
अनेक पिढ्या पोसण्याचा' (पृ. ८०)

झाडांकडून माणसाने एवढा जरी आदर्श घेतला तरी, 'जगण्याच्या लढाईत गुंतलेले समूह' आता सन्मार्गावर येतील हा कवीचा आशावाद निरर्थक ठरणार नाही. कारण 'या वसुंधरेची विस्कटलेली घडी' बसविल्याशिवाय ज्ञान-विज्ञानातील गतीलाही अर्थ उरणार नाही, हे कवीचे भाकित दुर्लक्षण्यासारखे नाही.

**कवीची जीवनदृष्टी आणि काव्यशैली**

'जसा लेखक तशी त्याची शैली' असे म्हटले जाते. शब्द हेच कवीचे मुख्य साधन. संत तुकोबा तर म्हणतात, 'आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने' यातून शब्दमहिमाच स्पष्ट होतो. हा कवीदेखील शब्द वेल्हाळ आहे. त्यामुळे शब्दांची विविध रूपे काव्यगत करतो. शब्द प्रेमळ असतात तसे शब्द माणसाचे मित्रही असतात. शब्दात चित्र आणि संगीत अनुभवता येते. म्हणून शब्दांचा सन्मान कवीस करावासा वाटतो. कारण हे शब्दच कवीस आपले मनोगत काव्यरूपात व्यक्त करण्यास पुढे सरसावतात. म्हणूनच कवी म्हणतो, 'शब्द ही शक्ती। शब्द ऐसी भक्ती। शब्द देती मुक्ती। माणसाला (पृ. ७५) या शब्दातूनच कवी आपल्या जीवनातील सुख-दुःख, संयम, शहाणपण, तडजोड यांची सहजपणे अभिव्यक्ती करतो आणि अशी अभिव्यक्ती जीवनदृष्टी सूचित करते.'

'मारशील कितीदा मला? होईन पुन्हा मी जिवंत
खेळात तुझ्या जीवघेण्या कधी मी थकणार नाही'
(पृ. १८)

या गझलेतून कवी आपल्या जिद्दी वृत्तीचे नियतीला आव्हान देतो. कवीची ही झुंजी'ची भाषा निकराची आहे. आपले जीवनचिंतन व्यक्त करताना 'प्रत्येकाच्या आत-समुद्र, डोंगर, आभाळ, वादळ अशी प्रतीके असतात. त्यातूनही ध्येयनिष्ठ माणूस धीराने निभावून नेतो, हे वैचारिक पातळीवर सांगतो. सखीच्या आठवणींची वेदना' - बाभळीच्या काट्यासारखी तळव्यात रूतल्याचा अनुभव








सुंदर उपमेतून येतो. तर हसण्याचा खळाळ शुभ्र झ-यासारखा आवखळ वाटतो. 'आठवर्णींची वेदना' ही प्रतिमा आणि निळ्याआभाळासारखं 'प्रेमळ रूप' या उपमा कवीच्या निरागस मनाच्या द्योतक आहेत. त्यांच्या काही कविता संतांच्या अभंगांचे रूप घेतात. उदा., प्रिय तुकोबा 'शब्द', काळ, काही कविता, आशयद्रव्य आणि अभिव्यक्तीच्या तादात्म्यामुळे अंतर्गत 'लय' साधतात. उदा., 'जपून ठेव', 'झाडे', 'कवितेची झिंग' इ. यात एक कडवे कुठे संपते आणि दुसरे कोठे सुरू होते हेच अंतर्गत लयीमुळे कळत नाही.

काही निवेदनात्मक कविता मुक्तशैलीत आहेत. उदा., 'जरा थांब' 'दुःख, एक गुरू', साहेब आणि सभा 'खत' आम्ही कासवछापवाले' इत्यादी कविता आदर्श विचारदर्शक आहेत. पण विचारप्रदर्शनामुळे अंतर्गत लय खंडित करतात.

सभोवतालच्या विषम वास्तवाचे चित्रण कवी पोटतिडकीने वेचक शब्दातून यशस्वीपणे करतो. बोटांवरचे रंगीत ठसे' साचलेली डबकी, 'पुत्र झाला बेईमान', 'उन्मत डास', 'किडलेली व्यवस्था' हे शब्द यथार्थ अर्थ ध्वनित करतात. त्यातून कवीची उबगलेली मानसिकताच स्पष्ट होते. तरीपण कवीचा जीवनातील आशावाद अद्याप शाबूत आहे. उदा., आशा सुगीची मध्ये कवी म्हणतो,

'राब राबता-राबता। गेलं वरीस सरून। आशा पुढल्या सुगीची। आहे मनाशी धरून' किंवा गुढी प्रेमाची' मधील - 'जात, धर्म, भाषा प्रांत। भेद विसरून जाऊ' सामाजिक ऐक्य आणि 'जपून ठेव' मधील 'अंधारू दे कितीही। वारा वाहो कसाही। माझं ऐक मित्रा। पणती जपून ठेव'- हा आशावाद बोलका आहे. म्हणूनच कवीची - ही आशावादी जीवनदृष्टी, 'दुरून कुठून तरी' मधील

'दुरून कुठून तरी। एका झाडांतून। नवं घर
तयार करतानाचा सुतार पक्षाचा। टक-टक-टक।
आवाज मात्र। कानावर येतो' (पृ. ४२)

हा कवीचा अंतस्वर खूपच आश्वासक आहे. मुखपृष्ठावरील वठलेले पण विविध रंगाचे ठिपके दृश्यमान करणारे चित्रही कवीच्या आशावादाचेच द्योतक आहे, असे म्हणावेसे वाटते. त्या पलीकडील पांढरा रंगही यशाचे प्रतीक वाटतो.

दुरून कुठूनतरी (कविता संग्रह)
दिलीप पाटील.
प्रकाशक - प्रतिमा पब्लिकेशन्स
पुणे. पहिली आवृत्ती - नोव्हेंबर
२०१४.














## जुने लेखन
# पुंडलिक

मी उपनिषदें पाठ करीत विणण्यांचें कबूल करून आलों. पण तसें विणतांना त्याकडे लक्ष नसल्यामुळें एका बाजूला जोरानें व दुस-या बाजूला हळू ठोका बसल्यामुळें वीण तिरकी बसत गेली. ही तिरकी वीण चांगली वीत दीड वीत पर्यंत झालेली ती सहज पू. गांधीजींच्या नजरेला आली. त्यांनी हंसून म्हटलें कीं, 'ती सर्व वीण उकलून काढा. सूत नाश करूं नका. वेळ गेला तरी चालेल.' तें सर्व उकलून काढण्यांत तीन चार दिवस गेले व त्याचा मला फारच त्रास झाला.

याच सुमारास मद्रासकडून एका विणकाम शिक्षकाची मागणी आश्रमाकडे आलेली होती. पू. गांधीजींनी मला तिकडे पाठविण्याचें ठरविलें आहे असें मला कोणींतरी सांगितलें. मला त्यांतलें कांय येतें? मी मद्रासला जाऊन काय करणार? उगाच आपली फजिती मात्र व्हावयाची! असे अनेक विचार माझ्या मनांत येऊन गेले. म्हणून मीं फिरावयाच्या वेळीं गांधीजींना सांगितलें की, 'मी मागावर जरी आज तीन चार महिने बसत असलों तरी मीं कांहीही काम केलेलें नाहीं व कांहीं शिकलेलोंही नाहीं. तेव्हां मद्रासच्या बाजूला दुस-या कोणाला तरी पाठवावें.'

'मद्रासला जाऊन तेथील लोकांना तसें सांगून परत आश्रमांत आलांत तरी चालेल. पण तुम्ही मद्रासला जाच!'

'मलाच जावें लागणार असेल तर मला आठ-पंधरा दिवसांचा अवधी द्यावा. मी सर्व शिकून घेतों व नंतर मी जाण्यास तयार आहें.'

त्याप्रमाणें मी श्री. मगनलालजी यांना भेटलों व त्यांच्याकडून माग घालण्या-काढण्याचीं मापें वगैरे घेऊन आठ-दहा दिवस खटपट केली. त्याच्या नोट्स् तयार केल्या. दोन-तीन माग मीं माझ्या हातानें बसविले. श्री. मगनलालजींनींही माझ्यासाठीं पुष्कळ वेळ खर्च केला. पण माझीही तयारी होऊन मी मद्रासला जाण्यास सिद्ध होईपर्यंत दुस-या मनुष्यास पाठविण्यांतही आलें होतें. मला मात्र तेव्हांपासून रोज अमुक इतकें कापड विणावेंच लागू लागलें. त्या वेळीं आश्रमांत गिरणीचेंच सूत वापरीत असल्यामुळें विणकाम त्या मानानें सोपे होतें.

मी ज्या वेळीं विणकामांत गेलों त्याच दिवसांमध्यें आश्रमांत एक 'मार्जन मंडळ' स्थापन झालें होतें. 'मार्जन मंडळ' म्हणजे भांडीं घासण्याची जबाबदारी घेणारें मंडळ. या मंडळाचे अध्यक्ष श्री. विनोबाजी भावे होते व मी कांहीं दिवस चिटणीस होतों. भोजन शक्य तितकें एका वाढीनेंच देण्याची वहिवाट होती. पण त्याशिवाय कोणाला कांहीं पुन्हां अधिक घ्यावेंसें वाटल्यास एक कोणीतरी वाढावयास मागें रहात असे. त्या दिवसांत सर्वांना वाढण्याचें काम पू. गांधीजी स्वतःच करीत असत आणि प्रत्येकानें आपली ताटवाटी घेऊन टेबलापुढें जावयाचें व पाहिजें तें मागून घ्यावयाचें. कोणाला कोणता जिन्नस किती पाहिजे हें गांधीजींना पाठ झालें होतें. मला अमुक-अमुक इतकें पाहिजे आहे असें सांगण्यापूर्वीच 'गांधीजी आपल्याला इतक्या रोटल्या ना?' असें विचारीत असत. एखादी रोटली कमी मागितली, तर 'आज एक रोटली कमी कां?' असें गांधीजी विचारावयाचेच!

गांधीजींचा नातू व आणखी एक-दोन मुलें गांधीजींनीं हातांत जो जिन्नस वाढावयास आणिला असेल तो तेवढा सोडून इतर जिन्नस मागावयाचीं! आणि गांधीजी टेबलापर्यंत गेले म्हणजे त्यांच्या हातांतील जिन्नस मागावयाचा!

एकदां गांधीजींचा नातू रसिक यानें पंक्तीमध्यें तूप अधिक मागितलें. पण गांधीजींनीं त्याला अधिकचें तूप घातलें नाहीं. 'आपण जो येथें आश्रमांत पैसा खर्च करतों तो सार्वजनिक पैसा आहे. तो फार बेतानें व काळजीपूर्वक खर्च केला पाहिजे. तुला अधिकचें तूप घातलें, तर मला सर्वांना घालावें लागेल. कारण हीं सर्व माणसें तुझ्याइतकींच मला जवळचीं आहेत.' अशा प्रकारें नातवाला उद्देशून गांधीजी बोलूं लागले. पण रसिक आपला हट्ट सोडेना. रसिकानें 'मी आज सायंकाळपर्यंत उपवास करणार आहें' असें बोलून आपल्यापुढील ताट









मागें सारलें. गांधीजींनीं मग तें ताट उचलून नेलें. पुढें तास दोन तासांनंतर रसिकला विशेष भूक लागल्यामुळें तो तुपाशिवाय जेवण्यास तयार झाला. तरी गांधीजींनीं त्याला सायंकाळपर्यंत जेवण दिलें नाही. संध्याकाळपर्यंत न जेवण्याची प्रतिज्ञा पालन करावी. प्रतिज्ञा एकदां केल्यावर ती सोडूं नये असेंच त्याच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. आज जरी त्या लहान मुलाला कांहीं समजत नसलें तरी त्याच्या मनावर त्याचे संस्कार चांगले होतात हीच भावना त्याच्या बुडाशीं होती. असो. या बाबतींत रसिकच्या वतीनें केलेली 'बा' ची मध्यस्थी कामाला आली नाहीं. जवळजवळ एका वाढीनेंच भोजन करण्याची प्रथा असल्यानें सर्वांचीं जेवणें आटोपण्यापूर्वी स्वयंपाकाचीं भांडीं मोकळीं करून प्रत्येकापुढें एक-एक आळीपाळीनें घासण्यासाठीं ठेवण्यांत येत असत आणि भांडीं चांगलीं घासलीं जात आहेत कीं, नाहींत हें पाहण्याचें काम 'मार्जन मंडळा'चें असे. भांड्यामध्यें आपलें तोंड दिसलें पाहिजे असेंच अध्यक्ष म्हणत असत. अध्यक्षांच्या नापसंतीमुळें रोज एकदोघांनंतरी भांडें पुन्हां घासावें लागे. अशाप्रकारें पुन्हां भांडें घासावें लागण्याची पाळी माझ्यावर अध्यक्षांनीं पुष्कळदां आणलेली होती. मी त्यांना एकदां रागानें म्हटलें होतें कीं, 'तुम्ही स्वतःच काळे असल्यामुळें तुमचें तोंड त्यांत कसें दिसावें?' पण अध्यक्ष अगदीं शांतपणें मला म्हणाले कीं, 'तोंड भांड्यांत दिसण्याच्या दृष्टीनें काळा रंग अधिक चांगला.' या ठिकाणीं गणित व्यस्त आहे. चुलीवर ठेवावयाच्या भांड्यांना बाहेरून राख लावण्याचें काम तें भांडें घासून ठेवण्याच्या वेळींच करावयाचें असे. भांड्याला राख लावण्याला जो कोणी विसरेल त्यालाच दुसरे दिवशीं तें जळकें भांडें घासावयास द्यावयाचें. भांडी घासीत असतांना मंडळाचे अध्यक्ष एखाद्या विषयाची चर्चा चालू करत असत. चुलीवर ठेवून जळलेलीं भांडी घासण्याची पाळी काकासाहेब, नरहरिभाई, बँकर, महादेवभाई अशा मंडळीवर आली असली व ते भांडीं घासावयास बसले असले म्हणजे त्या दिवशीं 'भार्जन मंडळा'च्या चर्चेला मोठा रंग चढत असे.

एकदां मलाच वाटलें कीं, या आश्रमांत राहून कामांत अंगचोरपणा करून वेळ काढून तो वाचनांत खर्च करण्यापेक्षां आपण गांधीजींना विचारून वाचनास स्वतंत्रपणे वेळ मागून घ्यावा. त्याप्रमाणें मीं गांधीजींना भेटून विचारलें. ते म्हणाले, 'तुम्हांला वाचनास रोज किती तास पाहिजेत?'

'तीन तास पुरे होतील.' मीं म्हटलें.

'इतका वेळ मी तुम्हांला सहज देऊं शकेन. चार वाजतां झोंपून उठल्यानंतर तोंड वगैरे धुण्यास किती वेळ लागतो?'

'पंधरा मिनिटें तरी लागतात. मीं म्हटलें.'

गांधी : 'साडेचार वाजतां प्रार्थना सुरू होते. मी म्हणतों तेथें तुम्हांला दहा मिनिटें तरी मिळतील. प्रार्थनेनंतर नाश्ता किती वाजतां होतो? प्रातःविधि आटोपून नाश्ता करावयास जाण्याच्या वेळेपर्यंत किती वेळ तुम्हांला मिळूं शकेल?'

मी : 'फार तर पंधरा मिनिटें मिळू शकतील.'

गांधी : 'पहा. एवढ्यांतच पंचवीस मिनिटें झालीं!'

अशा रितींने प्रत्येक दोन कार्यक्रमांमधील वेळांचा हिशेब करून त्यांनीं मला जवळ जवळ साडेतीन तास काढून दिले.

'पण असें, मीं म्हटलें, 'वाचनाकडे लक्ष कसें लागेल?'

'तेंच शिकणें महत्त्वाचें आहे! आपलीं इतर कामें अगदीं लक्षपूर्वक आपण करूं लागलों, तर आपल्याला आपलें मन कोणत्याही गोष्टीवर, त्यांत मग वाचनावरही, तें वाटेल तेव्हां झटकन् एकाग्र करतां येतें. शिवाय जीवनामध्यें वाचनाला इतकेसें महत्त्व नाहीं. मननाला अधिक महत्त्व आहे आणि त्याहीपेक्षां आचाराला खरें महत्त्व आहे. वाचलेल्या किंवा पटलेल्या गोष्टींचे मनन व त्याहीपेक्षां त्याचें प्रत्यक्ष आचरणच आपल्याला जीवनामध्यें उपयोगी पडत असतें आणि आश्रमाच्या सर्व कामातून तुम्ही गेल्यानंतर स्वतंत्रपणे केवळ वाचनासाठीं सहा महिने या आश्रमात रहा. पण आपल्या कार्यक्रमांत - हाती घेतलेल्या कार्यात उदासीनता येऊं देऊं नये.'

तेव्हांपासून मी माझ्या कामाविषयींची तक्रार पुन्हां गांधीजींपर्यंत नेण्यास मगनलालजींना संधी दिली नाही आणि त्या दिवसामध्यें माझें वाचनही कमी झालें असें नाही.










**६४ प्रार्थनेस दोन्ही वेळां हजर राहण्याचा आग्रह**

आश्रमांतील दोन्ही वेळच्या प्रार्थनेस प्रत्येकानें अवश्य हजर राहिलें पाहिजे असा मगनलालजींचा आग्रह असे. प्रार्थना चालू असतांना त्यांचें स्वतःचें लक्ष, प्रार्थनेपेक्षां प्रार्थनेस आज कोण कोण हजर नाहींत, त्यांना गैरहजर राहण्यास तसें योग्य कारण आहे किंवा नाहीं, याकडे असे व याचाच ते अधिक विचार करीत असत आणि दिवसभरामध्यें त्यांना त्यांना भेटून विचारल्याशिवाय मगनलालजी रहावयाचे नाहींत. मी पहाटेच्या प्रार्थनेस कधींच जात नसे. साबरमतीची थंडी भयंकर आणि मला कपडे बेताचेच असत आणि त्याशिवाय आळसही माझ्या मदतीला येत असे. श्री. मगनलालजींनीं मला एक-दोन वेळां पहाटेची प्रार्थना न चुकविण्याबद्दल सांगितलें.

'मला जाग येत नाहीं; कामानें थकून जातों; तेव्हां मला कोणी उठवील, तर मी प्रार्थनेस जरूर हजर राहीन.' मीं त्यांना सरळ सांगून टाकलें.

'बाहेर कोणत्याही पडवीमध्यें तुम्ही झोंपा म्हणजे तुम्हांला उठविण्यास सोपें जाईल. मी स्वतः उठवीन.' मगनलालजी म्हणाले.

'मला पू. काकासाहेबांच्या सहवासाचाही फायदा घ्यावयाचा आहे. मी त्यांच्या घरींच झोंपणार.' मगनलालजींना निरुत्तर करण्यासाठी मीं उत्तर दिलें.

त्या दिवसांत काकासाहेब कालेलकर क्षयाच्या भावनेनें आजारी होते. म्हणून त्यांना कोणीही लवकर उठवीत नसत. त्यांची झोपमोड करावयाची नाहीं अशी काळजी सर्व लोक घेत असत. मी त्यांच्याकडे झोंपण्यास राहिलों, तर मलाही कोणी जागें करणार नाहीं हें मला पक्कें माहीत होतें. मगनलालजींनाही तें कळून चुकलें होतें. शेवटी त्यांनी कंटाळून गांधीजींकडे तक्रार केली. त्यांच्याकडून बोलावणें आलें. त्यांच्यापुढेंही मीं माझीं तींच कारणें सांगितलीं. पण गांधीजी म्हणाले की, 'ठीक, तुम्हांला प्रार्थनेच्या पूर्वी आपोआप कोठेंही झोपलां तरी जागें होता येईल, मात्र तशी तुमची इच्छा पाहिजे.'

'माझी इच्छा प्रार्थनेला हजर राहाण्याची नाहीं असें नाहीं.'

'मग तुम्ही असें करा कीं, चार वाजतां घंटा वाजविण्याचें काम तुम्ही करीत जा. ज्या दिवशीं तुम्ही तें करूं शकणार नाहीं त्या दिवशीं मी स्वतः करीन.'

आतां एवढ्या मोठ्या माणसाला मीं कसा त्रास द्यावा? असें माझ्या मनांत येऊं लागलें. त्यामुळें पावणेतीनलांच मी आपोआप दचकून जागा होत असे. दार उघडतांना दाराच्या आवाजानें पू. काकासाहेब यांची झोपमोड होईल व ते आजारी पडतील या भीतीनें मी मग बाहेरच झोपू लागलों. मी जागा झालों नाहीं अशा समजुतीनें एकदां गांधीजी घंटा वाजविण्यासाठी घंटेजवळ येत होते आणि मीही दुस-या बाजूने घंटेकडेच चाललों होतों. एकदम पळत जाऊन मींच घंटा वाजविली. त्या वेळीं गांधीजी खूपच हंसले. त्या दिवशीं मीं त्यांना सांगितलें कीं, 'आपण आतां कधींही घंटेची काळजी करूं नये. मी ती अगदीं वेळेवर वाजवीत जाईन.' पण तें काम पुढें जगन्नाथभाई या नावांच्या एका मनुष्याकडे गेलें आणि मीं प्रार्थना कधींही चुकविली नाहीं. प्रार्थनेमध्ये गांधीजी कधीं कधीं बोलतही असत. पण अमुक दिवशीं बोलतील व अमुक दिवशीं बोलणार नाहींत असें मात्र सांगतां येत नसे. कोठेतरी बाहेर फिरतीवर जाऊन आले म्हणजे मात्र हकीकत सांगण्यासाठीं म्हणून ते खात्रीनें बोलत असत. हा मात्र नियमच झाल्याप्रमाणें झालें होतें.

**टीप** :-

हा मजकूर पुंडलीकजी कातगडे यांच्या 'पुंडलीक'या आत्मचरित्रातून घेतला आहे : (१९५०)

१) मगनलालजी पटेल — साबरमती आश्रमांचे मुख्य व्यवस्थापक

२) काकासाहेब कालेलकर — गांधीजींचे अनुयायी : मराठी, गुजराती व हिंदी भाषांतील नामवंत साहित्यिक.

३) नरहरीभाई बँकर — गांधीजींचे अगदी सुरुवातीचे सहकारी.

४) महादेवभाई देसाई — गांधीजींचे चिटणीस.












## लेखकांचा परिचय

◈ **मुखपृष्ठावरील चित्र :**

**चित्रकार -** जितेंद्र लक्ष्मण साळुंखे,

**पत्ता :-** मल्हारपुरा, मूक-बधिर विद्यालयामागे, चोपडा, जिल्हा जळगाव - ४२५ १०७.

भ्रमणध्वनी : ९९७०७८३४०५.

◈ **श्री. एम एस चौगुले.**

सेवानिवृत्त अभियंता, समाजवादी प्रबोधिनीमध्ये निरनिराळ्या विषयांवर शोधनिबंध प्रसिद्ध, कॉम्रेड एस. पी. पाटील यांच्यावर पुस्तक प्रसिद्ध.

***पत्ता :–*** शिवप्रसाद, घर नं. १७९५, मु. पो. बेडकिहाळ. ता- चिकोडी, जि.- बेळगाव. मो. नं. ०९५३५१९५९७४

◈ **श्री. के. वनपाल**

श्री. वनपाल यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची परीक्षा देऊन मामलेदार म्हणून नोकरीस सुरुवात केली व पदोन्नती मिळवत ते महसूल खात्याच्या सचिव पदावरून निवृत्त झाले. शेती, शेतकरी व त्यांचे अर्थकारण याची त्यांना तृणमूल स्तरावरून माहिती आहे.

***पत्ता :–*** अ-८, रे-व्हेन्यू को. ऑ. हाऊसिंग सोसायटी, गणेशखिंड रस्ता, आय्-सी-एस् कॉलनी. पुणे ४११ ००७. मो. ९९२२५०१४६४.

◈ **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.

**पत्ता :-** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे - ४११००४.

दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

◈ **डॉ. प्रभाकर गद्रे**

इतिहासाचे निवृत्त प्राध्यापक, धुळ्याच्या राजवाडे संशोधन मंदिरात संशोधनाचे काम करतात.

***पत्ता :–*** राजवाडे संशोधन मंडळ, राजवाडे पथ, गल्ली क्र.१, धुळे ४२४ ००१

◈ **डॉ. अवनीश पाटील.**

इतिहास अधिविभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

***पत्ता :–*** फ्लॅट नं. - १४७ हौसिंग सोसा. नं. ४, रत्नाप्पाकुंभारनगर, कोल्हापूर. पिन - ४१६ ०१३

भ्रमणध्वनी :- ९४२१५८५२९१ इमेल : avnishpatil@gmail.com

◈ **प्राचार्य डॉ. पंडितराव शा. पवार**

मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.

***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक – ४२२०१३.

दूरध्वनी :– (०२५३) २३४३७८७. भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

## आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ७० वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ४००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

–gSmXH$_S>i

## लेखकांस आवाहन

'नवभारत'मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता'कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.
२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.
३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत'च्या संपादकांना द्यावी.
४. 'नवभारत'मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत'मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

– संपादक मंडळ

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.








